॥ श्री ॥

लोकमित्राची पंधरावी भेट.

# निबंधसंग्रह.

प्रकाशक

द. गो. सडेकर संपादक 'लोकमित्र' व
धनंजय छा० चे मालक खानापूर-बेळगांव.

सन १९०५ इ०

वर्गणीदारांस फुकट.

इतरांस

किंमत ०८ आणे.

# प्रस्तावना.

आपल्या या भरतखंडामध्यें इंग्रजांचें सार्वभौम राज्य सुरू झाल्यापासून देशांतील दंगेधोपे बरेच नाहींसे होऊन सर्वत्र शांतता झाली आहे, त्याचप्रमाणें ज्ञानाचा प्रसार झपाट्यानें होत चालल्यामुळें लोकांना वाचनाची अभिरुचिही बरीच लागलेली दिसत आहे. वाचनाचा मुख्य फायदा ह्मणजे बहुश्रुतपणा हा होय. व हा गुण अंगीं येण्यास व त्याचप्रमाणें मन प्रगल्भ व शुद्ध होण्यास विविध माहितीचीं पुस्तकें वाचलीं पाहिजेत. यावरून सध्याचेकाळीं निरनिराळ्या प्रकारच्या बोधपर पुस्तकांची किती जरूरी आहे हें दिसून येईल.

अलीकडे कादंबऱ्या व नाटकें यांची अगदीं रेलचेल होऊन गेली आहे. बहुतेक कादंबऱ्याची धर्ती एक असते व त्यांतील वर्णनेंही व्यवहारास अनुलक्षून असत नाहींत. यामुळें त्यांपासून व्हावा तसा फायदा होत नाहीं. यावरून कादंबऱ्या ह्मणजे कुचकामाच्या असें ह्मणण्याचें मी कदापीही धाडस करणार नाहीं. कारण कित्येक कादंबऱ्या व नाटकें विद्वान् लोकांनीं लिहिलेलीं आहेत व त्यांपासून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. परंतु लोकांचीं मनें सद्गुणापेक्षां दुर्गुणाकडे विशेष वळतात; याकरितां जेणेंकरून मनोरंजन होऊन लोकांचीं मनें सद्गुणाकडे वळतील असें एखादें पुस्तक लिहावें असें माझे मनात आल्यावरून मी हें निबंधसंग्रह पुस्तक लिहिलें आहे.

ज्याप्रमाणें म्याट्रिक्युलेशन परीक्षेंत सांगितलेल्या विषयावर इंग्रजीमध्यें सुमारें चाळीस ओळींचा निबंध लिहावा लागतो त्याप्रमाणें फायनल व मुलकी परीक्षेमध्येंही सुमारें चाळीस ओळींचा निबंध मराठींत लिहावा लागतो. ह्या निबंधाला मार्क बरेच असतात. तथापि बहुतेक मुलें ह्या बाबतींत फार हयगय करितात. इंग्रजीमध्यें या विषयावर बहुत पुस्तकें आहेत; परंतु मराठीमध्यें अशी पुस्तकें फारशीं झाली नाहींत. यामुळें असें एकादें पुस्तक लिहिलें असतां विद्यार्थ्यांना फार उपयोगी पडून त्यांचे श्रम वांचतील व इतर जनांसही त्यापासून मनोरंजन होऊन बोध होईल असें वाटल्यावरून हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे.

हा माझा प्रथम प्रयत्न असल्या कारणानें यांत बहुत चुका झाल्या असतील. परंतु त्या चुका विद्वज्जन माफ करून हंसक्षीर न्यायानें गुणग्रहण करितील अशी मला आशा आहे. या माझ्या प्रयत्नाला उदार आश्रय मिळाल्यास यापेक्षां अधिक उमेदीनें लोकसेवा करण्यांत येईल. शेवटीं ज्या जगन्नियंत्याच्या कृपाप्रसादानें हें काम शेवटास गेलें त्याला वंदन करून ही अल्पशी प्रस्तावना पुरी करितों.

लेखक.

# अनुक्रमणिका.

॥ श्रीराम प्रसन्न. ॥

# निबंधसंग्रह.

## निबंधलेखन.

सृष्टीच्या आरंभापासून मनुष्याला उन्नितावस्था प्राप्त होण्यास ज्या कला प्राधान्येंकरून कारणीभूत झाल्या आहेत, त्यांपैकीं लेखनकला ही एक प्रमुख होय. ही कला प्रचारांत येण्यापूर्वी ज्ञानार्जन करणें व त्याचप्रमाणें ज्ञानाचा फैलाव करणें फार श्रमाचें असे. एका पिढीचा इतिहास व तींतील ज्ञानी पुरुषाचे बहुमोल विचार हे दुसऱ्या पिढीस बहुधा दुर्मिळ होत असत, व यामुळें " पुढच्यास ठेंच, मागला शहाणा " या न्यायानें सुधारणेचें पाऊल पुढें पडणें अशक्य होतें, परंतु, लेखनकलेची कृती निघाल्यापासून सुधारणेस जोराची गति मिळाली आहे. पूर्वीचे आचार विचार लेखनद्वारां आह्मांस उपलब्ध झाल्यामुळें आमची विचारशक्ति वाढून तिला चांगलें वळण मिळतें व ज्ञानी लोकांस आपले विचार अज्ञजनांत पेरून, त्यांना अल्पप्रयासानें सुशिक्षित करितां येतें.

याप्रमाणें लेखनकला हें एक समाजशिक्षणाचें मोठें अंग आहे. हिच्यायोगानें पूर्वीचा पाया कायम ठेवून त्यावर नवी इमारत बांधितां येते; ह्मणजे पूर्वी प्रचलित असलेल्या विचारांचें नवीन दृष्टीनें परीक्षण करून, जे विचार सांप्रतकाळीं ग्राह्य ठरतील त्यांचा, व जे कांहीं नवीन वि-

चार सुचतील त्यांचा संग्रह करणें. अशा रीतीनें कोणत्याही विषयाचा सर्व बाजूंनीं पूर्णपणें विचारकरून तो लेखनद्वारां प्रसिद्ध करणें यालाच "**निबंधलेखन**" ही संज्ञा दिल्यास हरकत नाहीं.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, कोणत्याही विषयावर निबंध लिहावयाचा असतां, त्या विषयासंबंधानें जितकी माहिती मिळविणें शक्य असेल, तितकी मिळविणें हें अत्यंत आवश्यक आहे. ही माहिती तीन प्रकारांनीं मिळविणें जरूर आहे. ते प्रकार **वाचन, निरीक्षण** आणि **मनन** हे होत. पहिल्या प्रकारांत स्वतःच्या देशांतील अथवा परकीय देशांतील प्राचीन व प्रस्तुत काळच्या लोकांचे त्या विषयावर काय विचार आहेत, हें वाचनद्वारा समजून घेणें, याचा समावेश होतो. माहिती मिळविण्याचा दुसरा प्रकार ह्मटला ह्मणजे, जातीनें लोकांत मिसळून सामान्य लोकाचे विचार कसे काय आहेत, श्रेष्ठप्रतीच्या लोकांची चालचालणूक कशी काय आहे, वगैरे बारीकसारीक गोष्टींचें सूक्ष्म अवलोकनानें ज्ञान करून घेणें, त्याचप्रमाणें लोकांमध्यें काय समजुती आहेत, त्यांच्यामध्यें दंतकथा वगैरे आहेत किंवा काय, व तसेंच स्थळाची वगैरे माहिती स्वतः पाहून मिळविणें हें होय. तिसरें व सर्वांत महत्वाचें साधन ह्मणजे, जें जें आपण वाचतों, व स्वताच्या अनुभवानें व निरीक्षणानें जें ज्ञान आपणास मिळतें, त्याचें अत्यंत चौकसबुद्धीनें व एकाग्रतेनें मनन करणें होय. मनन केल्याशिवाय वाचन व निरीक्षण व्यर्थ होतें. एकाग्रतेनें कोणत्याही गोष्टीचें मनन केलें असतां जसे मनोहर विचार सुचतात, तसे कशानेंही साध्य होत नाहींत. जित-

ज्या रीतीनें आपल्या मनाचें तादात्म्य त्या विषयाशीं होईल, तितक्या रीतीनें तो सुरस अथवा नीरस होईल. ज्या विषयावर लिहावयाचें असेल, त्याचें मूर्तिमंत चित्र डोळ्यापुढें उभें करून त्यामध्यें जर मनाला तल्लीन करून सोडिलें, तर ते विचार फारच बहारीचे होतील यांत शंका नाहीं.

असो. अशाप्रकारें होताहोईलतों माहिती मिळवून निबंध लिहिणें फार आवश्यक आहे; कारण निबंधांत नेहमीं कोणतीही गोष्ट प्रतिपादण्यास सत्यप्रमाणांचाच आधार घेतला पाहिजे. कादंबरीसारखें काल्पनिक चित्र काढितां उपयोगाचें नाहीं. माहितीची सिद्धता झाल्यानंतर, ज्या विषयासंबंधीं आपणास लिहावयाचें असेल, त्याचें सामान्य स्वरूप वाचणारांचे मनांत चटकन् येण्याकरितां, त्या विषयाची पूर्वपीठिका देणें फार चांगलें असें वाटतें. यानंतर अतीशय महत्वाचा मुद्दा ह्मटला ह्मणजे विषयाचें पृथःकरण करणें हा होय. ज्याप्रमाणें वैद्यकशाळेंत शरीराचे वेगवेगळे भाग करून, त्याचे पुन्हां पोटविभाग करितात, व मग त्या विभागाची माहिती देतात, त्याप्रमाणें प्रत्येक विषयाचे जितके सूक्ष्मभाग करितां येतील, तितके करून, मग त्या प्रत्येक विभागाचें सविस्तर रीतीनें विवेचन केल्यास, लिहिण्यांत विसंगतपणा न होतां त्यांतील आशय वाचणारांच्या ध्यानांत तेव्हाच येईल.

आणखी एक महत्वाचा मुद्दा असा आहे कीं, लिहिणाराचा हेतु वाचकाच्या ध्यानात तेव्हांच येईल, अशा साहजिक स्फूर्तीनें कोणत्याही विषयाचें विवेचन झालें पाहिजे, व ही साहजिक स्फूर्ति सतत अभ्यासानें व चिंतनानें, मनाचें त्या विषयाशीं पूर्ण ऐक्य होऊन व यथार्थ-

ज्ञान झाल्याशिवाय कधींही यावयाची नाहीं. ही सहृद्‌यता प्राप्त झाली असतां, लेख वाचणारास अगदीं तल्लीन करून त्याच्या मनावर आपल्या विचारांचा पगडा बसविण्यास समर्थ होतो. याप्रमाणें कोणत्याही विषयावर लिहावयाचें असतां, ( १ ) वाचनद्वारां व निरीक्षणद्वारां जितकी माहिती मिळविणें शक्य असेल तितकी मिळविणें, ( २ ) माहिती मिळविल्यानंतर, तिचें सूक्ष्मरीतीनें मनन करून सिद्धांत ठरविणें, अथवा प्रमाणें बांधणें, अथवा त्या सिद्धांतापासून दुसरे सिद्धांत स्थापित करणें, किंवा त्यांचा उलगडा करणें, ( ३ ) विषयाचें सूक्ष्मरीतीनें पृथःकरण करून संगतवार मांडणी करणें, ( ४ ) व त्या विषयाशीं मनाचें तादात्म्य करून, त्याचें मूर्तिमंत चित्र वाचकांच्या डोळ्यापुढें उभें राहील व त्यांच्या हृत्पटलावर कोरिलें जाईल, असें लिहिण्याची साहजिक स्फूर्ति अभ्यासानें आणणें हे चार मुद्दे फार विचार करण्यासारखे आहेत, व हे ध्यानांत धरून जो प्रयत्न करील त्याला यश आल्यावांचून रहावयाचें नाहीं.

---

## ईश्वरोपासना.

---

कारणावांचून कोणतेंही कार्य घडत नसतें. कितीही असंभवनीय अथवा आश्चर्योत्पादक चमत्कार जरी आपल्या दृष्टोत्पत्तीस पडले तरी त्यांना कांहींना कांहीं तरी कारण असतेंच. ज्याप्रमाणें मृद्‌भांड्याचा कर्ता कोणी तरी कुंभार असला पाहिजे अशी आपण कल्पना करितों त्याप्रमाणेंच

ह्या जगडव्याळ सृष्टीचा उत्पादक कोणी तरी असला पाहिजे असें ह्मणणें विचार शक्तीला सोडून होणार नाहीं. कोणत्याही काळांत परस्पर विरुद्ध मताचे पक्ष असणारच व त्याप्रमाणेंच ईश्वर नाहीं असेंही ह्मणणारे कांहीं नास्तिक लोक आहेत. परंतु यांची संख्या फारच थोडी आहे. हे मूठभर नास्तिक लोक खेरीजकरून पृथ्वीवरील सर्व मनुष्यें कोणी तरी सृष्टिकर्ता आहे अशी कल्पना करितात व त्याची अनन्य भावानें प्रार्थना करितात.

ह्या जगावरील सर्व लोक—मग ते हिंदू असोत, मुसलमान असोत किंवा ख्रिस्ती असोत—आपआपल्या समजुतीप्रमाणें देवाची कल्पना करून त्याची पूजा करितात. कोणी मूर्तिपूजा करितात व कोणी मानसपूजा करितात व ह्याप्रमाणें आपलें प्रेम व्यक्त करितात. परंतु ईश्वराचें वास्तव्य किंवा मूर्तज्ञान होत नाहीं व जर एखाद्या नास्तिकानें अस्तिवाद्याला प्रश्न केला कीं ईश्वराचें अस्तित्व तुह्मी कशावरून करतां तर मोठ्या विचारी मनुष्यालाही उत्तर देणें कठीण पडेल, कारण ईश्वर अगम्य आहे व त्याची कल्पना मनानेंच केली पाहिजे व त्याचप्रमाणें ईश्वराचें प्रत्यक्ष स्वरूप पाहण्याची इच्छा न करितां सृष्टिचमत्कारावरूनच ईश्वरास ओळखावें असें तत्ववेत्ता साक्रेटीस ह्मणतो.

उत्क्रांतिवादाप्रमाणें जेव्हां मनुष्याची मूळ उत्पत्ति झाली तेव्हां त्यांना ईश्वरविषयक ज्ञान नसलें पाहिजे परंतु ज्ञानशक्तीच्या प्रभावानें विश्वोत्पादक व विश्वनियामक अशी एखादी अव्यक्त मूर्ति असली पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें, प्रथमतःच जेव्हा त्याचें लक्ष आकाशांतील चंद्र, सूर्य, तारादिकाकडे गेलें तेव्हां त्यांच्या मनांत पूज्य-

बुद्धी उत्पन्न झाली असली पाहिजे व हेच देव अशी कल्पना त्यांचे मनांत आली असेल. परंतु सूर्य चंद्राला गृहणें लागून किंवा मेघांनीं आच्छादिल्यामुळें ते दिसेनासे होत व वाऱ्याच्या योगानें मेघराजाचा पराजय होई व पवनराजाला पर्वतराज कोंडून टाकितात अशी अवस्था पाहून, सूर्यचंद्रादिक तेजोराशींना व आपवायूंना प्रेरणा करणारा कोणी तरी सर्वशक्तिमान प्रभू असला पाहिजे अशी कल्पना झाली असावी. विवक्षित जनस्थित्यनुरूप देवाचें वर्णन व स्वभाव केला आहे व करितात.

अज्ञान व रानटी लोकांच्या ईश्वरविषयक कल्पना फारच कोत्या व मूर्खत्वाच्या असतात. प्रत्येक व्यक्ति आपल्यावरून जग ओळखते व राष्ट्र हें व्यक्तिसमुदाय असल्या कारणानें रानटी लोकांचा देवही रानटीच असला पाहिजे. कारण ईश्वराचें मूर्तस्वरूप किंवा स्वभाव कोणालाही ठाऊक नाहीं व रानटी लोकांत सद्गुणांचा व ज्ञानाचा प्रभावच पडला नसल्याकारणानें आपल्या अंगीं जे जे गुण वसतात ते ते गुण ईश्वराच्या अंगीं पूर्ण रीतीनें वसतात अशी त्यांची कल्पना होणें साहजीक आहे. ह्मणूनच आपल्या रानटी समजुतीप्रमाणें देवाला बळी वगैरे देऊन संतुष्ट करण्याचा ते प्रयत्न करितात. परंतु लोक जसजसे सुधारत जातात तसतसें त्यांच्या ईश्वरविषयक कल्पना अमूर्त व प्रगल्भ होत जातात.

आह्मीं अज्ञानांधःकारांतून निघून ज्ञानदीपाच्या स्वच्छ व शुद्ध प्रकाशांत वावरत आहों. तेव्हां प्रत्येक प्राण्याचें जें आदिकर्तव्य त्या कर्तव्यास आह्मीं जागलें पाहिजे. ज्या अर्थी ईश्वर हा आपला आदिपिता अथवा उत्पन्नकर्ता,

पालनकर्ता, व शास्ता आहे त्या अर्थी त्याच्या आज्ञा आनंदानें मनोभावानें पाळून त्याची सदय अंतःकरणानें पूजा केली पाहिजे आपलें नेहमीं कल्याणच व्हावें अशी ईश्वराची इच्छा असल्याकारणानें प्रसंगीं तो आह्मांस शिक्षा करून ताळ्यावर आणितो. यामुळें आपण त्यास निर्दय न समजतां त्याचे उपकारच मानिले पाहिजेत. रानटी लोकांप्रमाणें ईश्वराला अन्य प्राण्याचा किंवा मनुष्याचा बळी देवून संतुष्ट करण्याचा प्रयत्न न करितां आपल्या सद्वर्तनानें व नीतीनें त्यास संतुष्ट करावें व सदैव ईश्वराची भीति मनांत वागवून सन्मार्गानें चालावें.

---

## आज्ञाधारकत्व.

---

ज्याप्रमाणें ईश्वराची आज्ञा मान्य करणें हें आपलें कर्तव्यकर्म आहे, त्या प्रमाणेंच प्रत्येक मनुष्यानें आपले आईबाप व वडील माणसें, गुरु किंवा राजा यांचें सदैव ऐकिलें पाहिजे; कारण त्यांच्या मनांतून नेहमीं आपलें कल्याण व्हावें असें असतें, व आपणही अज्ञान असल्या कारणानें त्यांचें सांगणें आपल्या हिताचें असतें. " वेडें कोंकरूं " व " पोट आणि अवयव " ह्या गोष्टी सर्वत्रांस अवगत आहेतच. यावरून आपल्या आईबापांच्या किंवा इतर वडील अथवा मान्य मनुष्याच्या आज्ञा मोडिल्या असतां काय परिणाम होतो हें दिसून येईल.

आतां आईबाप वगैरे वडील माणसांच्या व राजाच्या कोणत्याही आज्ञा मान्य केल्याच पाहिजेत असें कधींही

होणार नाहीं. जर एखाद्या बापानें रागाच्या आवेशांत मुलाला आगींत नेऊन उभें केलें व येथून हालूं नको अशी सक्त ताकीद दिली तर त्याप्रमाणें वागणें हें शहाणपणाचें होईल काय? जरी आपले आईबापाचे मनांत आपलें कल्याण व्हावें असेंच असतें तरी प्रसंगवशांत अज्ञानामुळें अथवा मोहामुळें त्यांच्या हातून चूक होण्याचा संभव आहे तर अशा प्रसंगीं त्यांस चार गोष्टी सागून त्यांची समजूत केली पाहिजे. जर आईबापांच्या आज्ञा आपण पाळिल्या नाहींत तर त्यांना दुःख होऊन आपलेंही अकल्याण होतें व ज्यांच्या हातून आईबापांच्या आज्ञा पाळवत नाहींत त्यांना आदिपित्याच्या ह्मणजे जगन्नियंत्याच्या आज्ञा पाळणें कधींही शक्य होणार नाहीं व यामुळें त्यांचा फार भयंकर रीतीनें शेवट होईल.

ईश्वराच्या आज्ञा पाळण्याची मर्यादा अति विस्तृत असली पाहिजे. कारण तो सर्व गुणांनीं संपन्न व परिपूर्ण असल्या कारणानें त्याच्या हातून अहितकर आज्ञा कधींही होणार नाहीं व आपलें सर्वस्वीं कल्याणच होईल. परंतु राजाज्ञेची मर्यादा फारच संकुचित असली पाहिजे. कारण राजा हा ईश्वरांश नसून समाज रक्षणाकरितां जनसंमतानें नेमलेला मनुष्य आहे. तेव्हां त्याच्याकडूनही चुका होण्याचा पुष्कळ संभव आहे. याकरितां जनसौख्याकरितां राजाच्या योग्य आज्ञा मानणें भाग आहे. परंतु त्यानें सांगितलेली प्रत्येक आज्ञा—मग ती योग्य असो किंवा नसो—मान्य करणें हें शहाणपणाचें होणार नाहीं. कारण, असें केलें असतां राजाची सत्ता अमर्याद वाढून देशामध्यें मोंगलाई माजेल आणि राष्ट्राचा व राज्याचा नाश होईल.

लष्करी खात्यांत आज्ञाधारकत्वाची फारच मानखरी असते. कारण या गुणामुळें सैन्याला उत्तमप्रकारची शिस्त लागून त्याच्या हातून उत्तम प्रकारच्या कामगिऱ्या अत्युत्तम रीतीनें पार पडतात. जो मनुष्य लष्करी आज्ञा मोडितो त्याला गोळी घालून ठार मारितात. या गुणाला इतकें महत्व देण्याचें कारण त्याचा अद्भुत पराक्रमच आहे. यांत कांहीं संशय नाहीं. सेनापतीनें रणभेरी वाजविल्या बरोबर अमुक ठिकाणीं अमुक वेळेच्या आंत आलेंच पाहिजे व तो सांगेल त्याप्रमाणें आपल्या जीवाचीही पर्वा न करितां लढलेंच पाहिजे अशी इंग्लीश सैन्याची व्यवस्था असल्या कारणानें त्यांचा विजय झाला, व आमच्यामध्यें ह्या गुणाचा अभाव असल्या कारणानें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसा होऊन आमची दुर्दशा झाली व आह्मी पारतंत्र्यपंकोदधींत पडलों.

---

## नम्रपणा.

नम्रपणा हा एक अमोलिक गुण आहे व तो अंगीं असणें हें प्रत्येक मनुष्यास भूषण आहे. ह्या अद्भुत गुणाच्यायोगानें मनुष्याची ह्या जगांत मानमान्यता वाढून मनुष्याचे दिवस सुखानें जातात. ह्या एक गुणामुळें त्याचे सर्व दुर्गुण लोपून तो सर्व संकटांतून पार पडतो. " महा पूरें झाडें जाती, तेथें लव्हाळे वांचती. " ही तुकारामाची उक्ती किती यथार्थ आहे बरें ! नम्र मनुष्य आपल्याला जें कांहीं येतें तें दुसऱ्याला सांगतो व आपल्याला जें

कांहीं येत नाहीं त्याबद्दल दुसऱ्याला विचारून शिकण्या-बद्दल त्याला कधींही लाज वाटत नाहीं. दुसऱ्यानीं त्याच्या चुका काढिल्या असतां न रागावतां तो आपल्या चुका सुधारण्याविषयीं यत्न करितो यामुळें त्याचा उत्कर्ष होतो.

जो मनुष्य **नम्र** असतो त्याला आपल्या गुणांची आणि आपल्या कर्तृत्वशक्तीची खात्री असते, यामुळें तो गर्विष्ठ मनुष्याप्रमाणें मूर्खपणानें भलत्याच कामाला हात घालून जगांत आपलें हसें करून घेत नाहीं. यास्तव लोकांकडून त्याला मान मिळून त्याची योग्यता वाढते. ह्या जगात जन्मास येऊन ज्याला आपली कीर्ति अजरामर करून ठेवायची असेल त्याच्या अंगीं हा गुण अवश्यमेव असला पाहिजे. आजपर्यंत रामदास, तुकारामादि जे महान् साधू ह्या आपल्या देशांत होऊन गेले त्यांमध्यें हा गुण प्रधानत्वेंकरून वसत होता हें सिद्ध होतें.

परंतु कोणताही गुण मर्यादेच्या बाहेर गेला ह्मणजे तो दुर्गुण बनतो. तीच गोष्ट ह्यालाही लागू आहे. कोण-त्याही मनुष्यानें-साधूखेरीज-पूर्ण नम्रपणा पतकरण्याचें मनांत आणिल्यास त्याचें करणें शहाणपणाचें होणार नाहीं. निदान जोंपर्यंत मनुष्याला ह्या जगात राहून जगा-कडून शाबासकी मिळविणें आहे तोंपर्यंत अंगीं काहीं तरी पाणी असलें पाहिजे. आतां जे खरेखुरे साधू कीं, ज्यांना जगाची पर्वा मुद्लींच नसून ज्यांना जनसमाजाकडे लक्ष देणें नाहीं त्याची गोष्ट वेगळी, व ह्या दुर्गुणामुळेंच आह्मीं पराधीन होऊन दुःखसमुद्रात दिवस कंठीत आहों. आह्मीं सद्गुणाप्रमाणें चालूं लागलों, परंतु इतर राष्ट्रांच्या प्रगती-कडे लक्ष न देता कोणीं आमच्या श्रीमुखांत मारली

तरी आह्मीं नम्रपणाचे भक्त स्वस्थ बसूं लागलों व यामुळ आह्मांला पाहिजे त्यांनीं लुटावें, मारहाण करावी, जीवही घ्यावे तरी आह्मी स्वस्थच. शाबासरे हिंदूनों शाबास! तुमच्या नम्रपणाची कमाल झाली!! तुमच्यासारखे साधू ह्या भूमंडळांत तुह्मींच एक असें ह्मटलें पाहिजे. परंतु तुह्मीं जी ही सुधारणा केली ती सर्व जगाच्या प्रगतीकडे लक्ष देऊन केली नाहींत यामुळें तुह्मीं सांप्रत पश्चात्ताप पावत आहां. तर आतां हा फाजील नम्रपणा सोडून देऊन जगाबरोबर चालूं लागा व कीर्ति मिळवा.

जो खरा नम्र मनुष्य आहे, तो दुसऱ्यानें अन्यायाचरण केलें असता कदापीहि स्वस्थ बसणार नाहीं. तो धिटाईनें परंतु मर्यादेनें अथवा सभ्यपणानें दुसऱ्याची चूक पदरांत घालून त्याला लाजवील. एकेसमयीं बादशहा बीरबलाजवळ आपलीं वस्त्रें देऊन बेगमसहीत स्नान करित असतां बादशहा बिरबलास उद्देशून त्याला लाजविण्याकरिता ह्मणाला, "बिरबला, तुझ्या डोईवर एक गाढवाचें तरी ओझें आहे." या प्रश्नाला बिरबलनें काय उत्तर द्यावें बरें, जर त्यानें नम्रपणा पतकरून होय महाराज असें उत्तर दिलें असतें तर आज त्याचें एवढें गौरव आपण केलें असतें काय? खचित नाहीं. व जर रागावून गर्वानें त्यानें भलतेंच उत्तर दिलें असतें तरीही त्याचा नाश झाला असता; पण त्यानें नम्रपणानें जें उत्तर दिलं तें समयसूचकतेचें व खुबीचें द्योतक तर खरेंच पण त्या

उत्तरानें बादशहास राग न येतां आश्चर्य वाटलें व बिर-बलाची ख्याती झाली.

उदये सविता रक्तोरक्त श्चास्तमने तथा ।
संपत्तौच विपत्तौच महतामेकरूपता ॥ १ ॥

---

## प्रामाणिकपणा.

प्रामाणिकपणा हा सर्व गुणांत श्रेष्ठ आहे व यामुळेंच प्रामाणिकपणासारखी चीज नाहीं अशी ह्मण आहे. ज्याप्रमाणें मन हें इंद्रियांचा राजा आहें, त्याप्रमाणेंच प्रामाणिकपणा हा सर्व गुणांचा राजा होय. हा गुण ज्याचे अंगीं आहे तो सर्व गुणांनीं परिपूर्ण असलाच पाहिजे. ठीकच आहे. राजाला सोडून परिजन दुसरीकडे कोठें जाणार? जगांतील सर्व व्यवहार व उद्योग धंदे ह्या सद्गुणामुळेंच चालले आहेत असें ह्मटलें तरी चिंता नाहीं. असा हा जो सर्वमान्य गुण त्याला आपलें अंकित करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे.

प्रामाणिकपणा हा लहानांपासून तों थोरापर्यंत व नीचापासून तों श्रेष्ठापर्यंत सर्वांना सारखाच भूषणास्पद आहे. व अगदीं महत्वाच्या कामांत जितका प्रामाणिकपणा ठेविला पाहिजे तितकाच क्षुल्लक बाबतींतही तो ठेविला पाहिजे. जो मनुष्य एकदां लबाड ठरतो त्यावर लोक कधींही विश्वास ठेवीत नाहींत हें " धनगराचें पोर " या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें व अशा मनुष्याची पत राहत नाहीं यामुळें लोकांत त्याला मुदलीं मान नसतो व जो

मनुष्य क्षुल्लक कामाकरितां लबाडी करितो ती एक लबाडी पचली ह्मणजे त्याला उत्तेजन मिळून अधीक लबाड्या करितो व दुःख पावतो, हें चौथ्या पुस्तकांतील "ह्मातारी व तिचा मुलगा" ह्या गोष्टीवरून सिद्ध होतें व ह्या उदाहरणावरून ह्या महासद्गुणाची थोरवी मनांत येते.

प्रामाणिकपणाशिवाय कोणताही व्यवहार चालावयाचा नाहीं हें मागेंच सांगितलें आहे असें पहा कीं, व्यवहारामध्यें प्रत्येक मनुष्य प्रामाणीक समजूनच काम चालविलें पाहिजे; अन्यथा गत्यंतर नाहीं व ह्या प्रामाणिकपणाचा जर भंग झाला तर व्यवहार चालावा कसा? मनुष्य एकदां प्रामाणिकपणापासून भ्रष्ट पावला ह्मणजे त्याच्या अंगीं सर्व दुर्गुणाचें वास्तव्य सुरू होऊन त्याचा नाश होतो. मनुष्याला खोटें बोलण्याची संवय लागली कीं त्याला चोरी करावीशी वाटते, व एकदां चोरी पचली ह्मणजे दरवडे खून वगैरे अमानुष कृत्यें करण्याला तो मागेंपुढें पहात नाहीं. व त्याचा पश्चात्ताप त्याला फाशीच्या खांबावर करावा लागतो.

लबाड मनुष्याच्या मनाला—मग तो कितीही श्रीमंत असून चैन भोगीत असो—कधींही स्वास्थ्य नसतें. लबाडीनें पैसा मिळविला असल्याकारणानें व अघोरकर्में केलीं असल्यामुळें त्याच्या मनांत नेहमीं आपलीं दुष्कृत्यें उघडकीस येतील कीं काय ह्या भीतीनें तो काळजींत असतो. व त्याच्या जिवाला सौख्य ह्मणून नसतें. आपल्या घरचें चमचमीत अन्नखाऊन काळजी करीत बसण्यापेक्षां प्रामाणिकपणानें वागून कुटुंबामध्यें उल्हासवृत्तीनें मीठभाकर खाल्लेली काय वाईट आहे?

आतां कोणीं असें विचारील कीं चोरानें येऊन गळा

दाविला व द्रव्य कोठें आहे तें दाखीव असें विचारिलें असतां मुकाट्यानें आह्मीं त्याच्या स्वाधीन द्रव्य करावें किंवा कांहींतरी खोटें सांगून युक्तीनें त्यांना पिटाळून लावावें? या प्रश्नाचें समाधान प्रासंगिक नीतीनेंच केलें पाहिजे. जोंपर्यंत पृथ्वीवरील संपूर्ण मनुष्यें प्रामाणिकपणाच्या पूर्णसुखछत्राखालीं नांदत नाहींत तोंपर्यंत प्रामाणिकपणाचा नियम सार्वत्रिक चालणार नाहीं. याकरितां प्रसंगोपात् दुसऱ्याचें नुकसान होत नसल्यास खोटें बोलण्यास कोणत्याहीप्रकारची हरकत नाहीं. हा मुख्य नियम ध्यानांत ठेवून जो प्रामाणिकपणानें वागतो त्याचें कल्याण होतें.

अश्वमेधसहस्राणि सत्यंच तुलया कृतम् ।
अश्वमेधसहस्राद्धि सत्यमेवातिरिच्यते ॥ १ ॥

---

## सद्वर्तन.

ज्या सद्गुणमालेच्यायोगानें मनुष्यांस इहलोकीं सौख्य व कीर्ति मिळून अंती ते मोक्षपदाप्रत पावतात व जी माला मनुष्याचें खरें भूषण आहे त्या मालेपैकींच "सद्वर्तन" हा एक अमोलिक हिरा आहे असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. प्रत्येक मनुष्य–मग तो श्रीमंत असो वा दरिद्री असो–त्याच्या गुणावगुणाची परीक्षा त्याच्या वर्तनावरून होते, व त्याप्रमाणें लोकांच्या मनावर अनुकूळ अथवा प्रतिकूळ ग्रह उत्पन्न होतो; त्यावरूनच त्या गुणाची महती व किंमत प्रत्येकाच्या लक्षांत पूर्णपणें येणार आहे.

सकृद्दर्शनीं जो गुण मनुष्याचे दृष्टीस पडतो व ज्या गुणावरून त्याची परीक्षा करितां येते तो " सद्वर्तन " हा होय. मनुष्य कितीही नीचकुळांतला असो जर तो आचरणानें शुद्ध आहे तर त्याला सन्मानच दिला पाहिजे. कित्येक मनुष्यें सद्वर्तनावर मोठमोठीं संभाषणें करितात व अमुकरीतीनें वागलें असतां तुमचें कल्याण होईल अशा बाता मारितात, परंतु स्वतः त्याचें वर्तन पाहिलें असतां " लोकांसांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण " असें अत्यंत घाणेरडें असतें. परंतु त्यानीं खूप समजून ठेवावें कीं अशानें लोक कधींही फसणार नाहींत; व जर फसले तर लबाडी उघडकीस आल्याबरोबर त्यांच्या फजीतीस पारावार रहाणार नाहीं. " बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें " याप्रमाणें जर त्यांचें वर्तन चोख असलें तर लोक त्यांची देवाप्रमाणें पूजा करतील.

जर आपलें वर्तन शुद्ध आहे तर आपणांस कोणाचीही भीती राहणार नाहीं एवढेंच नव्हे तर सर्व लोक आपल्याला मनापासून पूज्यच मानूं लागतील. आरंभीं कांहीं दिवस लोक आपल्याला नानाप्रकारचीं नांवें ठेवून आपला छळ करितील. परंतु पुढील विजयाची गांठ पदरीं बांधून ठेवून दृढनिश्चयानें तो सोसला पाहिजे. कारण ज्याप्रमाणें " टाकीचे घांव सोसल्याशिवाय देवपण येत नाहीं " त्याप्रमाणें लोकांकडून छल सोसल्याशिवाय साधूपणा येत नाहीं. तुकारामाचा पुष्कळ लोकानीं व प्रत्यक्ष त्याच्या बायकोनेंही छल केला, परंतु तो सर्व छळ त्यानें मुकाट्यानें व मोठ्या सहनशीलतेनें सोशिला ह्मणूनच आज त्याची एवढी कीर्ती झाली आहे.

ज्याचें वर्तन चांगलें असतें त्याचें सर्वप्रकारेंकरून कल्याणच होतें. त्याची सर्व लोकांत मानमान्यता वाढून त्याच्यावर सर्वांचा विश्वास व प्रीती जडते. गांवामध्यें जर कांहीं जास्तकमी झालें तर त्याच्याकडे निवाडा करावयास येतात याप्रमाणें त्याचा जिकडे तिकडे गौरव होतो. याकरितां प्रत्येक मनुष्यानें सद्वर्तन ठेविल्यास जगाचें कल्याण होईल

सद्वर्तनानें वागणें हें प्रत्येक मनुष्याच्या हातचें काम आहे. त्याला कोठे पैसे देऊन तें विकत घ्यावें लागत नाहीं अथवा देशांतराला जाऊन मोठ्या प्रयासानें पैदाकरून आणावें लागत नाहीं. सद्वर्तनानें आपणास सौख्य होऊन दुसऱ्यांसही संतोष होतो. याकरितां प्रत्येकानें सद्वर्तन ठेवावें.

निन्दंतु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु ।
लक्ष्मीःसमाविशतु गच्छतु वा यथेष्टं ॥
अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा ।
न्यायात्पथःप्रविचलन्ति पदं न धीराः॥ १ ॥

---

## उद्योग.

---

जर आपल्याला ह्या क्षणिक जगातले चार दिवस सुखानें घालवावयाचे असतील, व जर आपल्यामागें आपली कीर्ति एकसारखी दुमदुमत रहावी असें वाटत असेल तर आह्मी दृढ उद्योग केला पाहिजे. आता कोणी असें ह्मणतील कीं, आपणाला उद्योग करून काय करावयाचें

आहे ! ज्याअर्थी परमेश्वरानें आह्मांस उत्पन्न केलें तेव्हां तो आह्मांस उपाशी मारील कीं काय ? आमच्याबरोबर आमचें अन्नही देवानें निर्माण केलेंच आहे, मग आह्मीं खुशाल चैनींत असावयाचें सोडून देऊन उगीच जीवास दगदग काय ह्मणून द्यावी ? ह्याला उत्तर एवढेंच कीं, असला प्रश्न करणें मनुष्यजातीला शोभत नाही. असा प्रश्न एखाद्या मूर्खानें केला तर तो फार शोभेल. " काकोपि जीवति चिरंच बलिंच भुंक्ते, " अथवा कुत्रा देखील आपलें पोट भरूं शकतो. मनुष्यप्राणी आपल्या बुद्धिवैभवादिगुणेंकरून सर्व प्राण्यामध्यें श्रेष्ठ आहे व त्या श्रेष्ठपणामुळेंच सर्व प्राण्यांपेक्षां त्याच्यावर विशेष जबाबदारी आहे. यास्तव अशाप्रकारच्या मनुष्यप्राण्यानें एखाद्या कुत्र्याप्रमाणें अथवा कावळ्याप्रमाणें आपली खळगी भरली तर त्याचें श्रेष्ठत्व काय राहिलें ! याकरितां उद्योग करणें हें मनुष्यजातीच्या उन्नतीस अत्यंत हितावह आहे.

प्रत्येक प्राण्याच्या बुद्धिमत्तेप्रमाणें ईश्वर त्याची राहणी ठेवितो, अथवा असें होणें हें स्वाभाविकच आहे. पशुपक्ष्यादिकांना सर्व पदार्थ आयतेच मिळतात यामुळें त्यांना आपलें भक्ष्य मिळविण्यास फारसे प्रयास पडत नाहींत; परंतु जसजसें आपण उन्नतावस्थेकडे पहावें तसतसें त्यांना आपलें अन्न मिळविणें फार कठीण पडूं लागतें; व त्याप्रमाणेंच मनुष्यप्राण्याची गोष्ट होय. याचें सर्व कारण त्याची बुद्धिमत्ता होय. बुद्धीच्यायोगानें मनुष्यांस अन्न मिळविण्यास अडचण पडते हें ऐकून आपणास कदाचित् आश्चर्य वाटेल परंतु ही गोष्ट सत्य आहे, एवढें मात्र खरें. एकेकाळीं मनुष्यही रानटी स्थितींत

असतांना इतर प्राण्यांप्रमाणें तो कंदमूळें भक्षण करून आपला उदरनिर्वाह करी व असें करण्यांत त्याला फारसे प्रयास पडत नसत परंतु मनुष्याला आपली बुद्धी वाढविण्याची शक्ती असल्यामुळें उत्तरोत्तर तो ऊर्जीत स्थितीस जाऊन पोंचला व त्याला आपलें पोषण करण्यास काय काय खटपटी कराव्या लागतात हें निदान सध्यांच्या काळीं तरी कोणास समजावून सांगावें लागेल असें मला वाटत नाहीं.

जसजसा समाज सुधारत जातो व सांग्रामिक काल जाऊन औद्योगिक कालास आरंभ होतो तसतसें, समाजांतील प्रत्येक व्यक्तीला आपलें पोषण करणें कठीण वाटूं लागतें, व जबर उद्योग केल्यावांचून गत्यंतरच नाहींसें होतें. पेशवाईंतली विद्या ह्मणजे अक्षर वळविणें, हिशोब करणें व युद्धकला शिकणें ही होय. परंतु जो मनुष्य ह्या वरील विद्येंत वाकबगार असे त्याचें आयुष्य जितक्या सुखानें जात असे तितकें सुख मिळविण्यास आतांच्या काळीं वर्षानुवर्षें अभ्यास करून शरीराचें मातेरें करून घ्यावें लागतें. यावरून आतांच्या काळांत सुखानें राहण्यास केवढा दीर्घोद्योग केला पाहिजे हें प्रत्येकाच्या लक्ष्यांत येईल.

आणखी एक गोष्ट येथें सांगून ठेविली पाहिजे ती ही कीं, उद्योग ह्म० केवल उदरंभरणाचा धंदा नव्हे; तर जेणेंकरून व्यक्तीपेक्षां एकंदर राष्ट्राचें हित होईल त्यालाच उद्योग ह्मटलें पाहिजे; व असल्या उद्योगापासूनच देशाचें कल्याण होईल. जो इंग्लंददेश एकेकाळीं केवळ रानटी स्थितींत होता तोच देश आज सर्व गोष्टींनीं उद्योगाच्या

योगानें संपन्न झाला आहे, व आम्हीं आळसानें दिवस घालवून दीर्घोद्योग केला नाहीं म्हणून आज या दुःखद स्थितीला येऊन पोंचलों. ह्या एका उदाहरणावरून उद्योगाचें महत्व लक्ष्यांत आणून आपण श्रम केले असतां आपणास कोणती गोष्ट साध्य होणार नाहीं; पण हें सर्व आमच्या लक्ष्यांत येईल तेव्हां ना ?

आमच्या लोकांत उद्योगाची अशी चमत्कारिक कल्पना आहे कीं, एकाद्यानें अल्पकाळपर्यंत अतिशय श्रम करून बराचसा पैसा मिळविला म्हणजे झालें, मग खुशाल रिकामटेकडेपणांत अथवा आळसांत काळ घालविला असताही कांहीं हरकत नाहीं. परंत ही समजूत चुकीची व कोतेपणाची आहे. मरेतोंपर्यंत उद्योग करणें हें मनुष्याचें कर्तव्यच आहे. ही गोष्ट लक्ष्यांत धरून जर प्रत्येक मनुष्य वागेल तर त्याचें अनहित कधींही होणार नाहीं.

उद्यमेनहि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ॥
नाहि सुप्तस्य सिंहस्य प्रविशान्ति मुखे मृगाः ॥१॥

---

## दृढनिश्चय.

प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः ॥
प्रारभ्य विघ्नविहता विरमंति मध्याः ॥
विघ्नैःपुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ॥
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ १ ॥

" मूर्खलोक विघ्नभयास्तव कोणत्याही कार्यास आरं-

भच करीत नाहींत. मध्यमधैर्याचे लोक विघ्न आलें असतां मध्येंच थांबतात. परंतु जे उत्तम लोक असतात ते शेंकडों विघ्नें आलीं तरी त्यांस न जुमानितां मोठ्या धैर्यानें आपलें काम चालूं ठेवितात, व असल्या मनुष्यानाच यशप्राप्ती होते." जरी उद्योग करण्यापासूनच मनुष्यांच्या सुखाची आशा आहे, तरी उद्योगाचा पाठिराखा व जिवलग मित्र दृढनिश्चय. याचा आश्रय केल्यावांचून मनुष्यास यशप्राप्ती व सुखप्राप्ती हीं कधींही मिळणार नाहींत.

कित्येकांची अशी कोती समजूत असते कीं, उद्योग केल्या बरोबर यशप्राप्ती अवश्य झालीच पाहिजे, व या समजुतीमुळें ते लागलेच निराश होतात व आपल्या अपयशाचें खापर देवाच्या अथवा नशीबाच्या माथीं फोडतात व आपण होऊन आपलें नुकसान करून घेतात, पण फिरून यत्न ह्मणून कधींही करीत नाहींत. जर " पी हळद आणि हो गोरी " या प्रमाणें ह्मटलें तर तें कधींही शक्य होणार नाहीं. एखाद्या क्षुल्लक गोष्टीला सुद्धा कधीं कधीं महाप्रयास पडतात मग एकाद्या अचाट उद्योगाला किती दृढनिश्चय आंगीं पाहिजे याची कल्पना करा.

दृढनिश्चयाचें पाठबळ असल्याशिवाय नुसत्या उद्योगानें कांहीं होणें नाहीं हें सत्य आहे. आपल्या उद्योगामध्यें जरी महान् महान संकटें आलीं तरीही प्रसंगीं न डगमगतां जे धैर्यानें कंबर बांधून उभे राहतात त्यांना जय आल्याशिवाय कधींही रहावयाचा नाहीं. जर शिवाजी दिल्ली येथें औरंगजेबाच्या कैदेंत पडल्याबरोबर हतवीर्य होऊन निराश झाला असता व त्यानें उद्योग करण्याचें सोडून दिलें असतें तर आज जी शिवाजीची कीर्ती त्रिभुवनांत गाजत

आहे व त्याचा जो एवढा गौरव होत आहे तो झाला असतां काय? व महाराष्ट्रियांना क्षणभर स्वातंत्र्यामृत प्राशन करावयास मिळालें असतें काय?

दृढनिश्चयीपणा इतर जीवकोटींतल्या नीच प्राण्यांतही आढळून येतो व त्यांच्या उदाहरणावरून मोठमोठ्या शूर पुरुषांना धीर येऊन त्यांच्याकडून महत्कार्यें घडून आलीं आहेत. स्कॉट लोकांचा रॉबर्टब्रूस ह्मणून एक शूर व दृढनिश्चयी राजा होऊन गेला. त्याची गोष्ट अशी—एके समयीं शत्रूपासून पराभव पावल्यामुळें व पदरच्या विश्वासू मंडळीची फाटाफूट झाल्यामुळें तो निराश व अत्यंत लज्जित होऊन अरण्यांत पळून गेला व झोंपडींत जाऊन चिंताग्रस्त होऊन पडला व आपल्याला आतां खास यश येत नाहीं असें वाटून तो फार निराश झाला. इतक्यात एक कोळी समोरील भिंतीच्या कोपऱ्यांतल्या जाळ्याकडे जाण्याचा प्रयत्न करीत होता. तिकडे ब्रूसचें लक्ष्य गेलें व त्याला मोठा आनंद होऊन तो त्या किड्याकडे पाहूं लागला. तो कोळी अगदीं भिंतीच्या शेवटापर्यंत जाई व अकस्मात खालीं पडे. या प्रमाणें पांच सहा वेळां झालें तरी तो यत्न करण्याचें सोडून देईना हें पाहून ब्रूसला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें व तो त्याच्याकडे यानंतर फारच लक्ष्यपूर्वक पाहूं लागला. व शेवटीं जेव्हां तो कोळी आपल्या घरावर चढून गेला तेव्हा ब्रूसला मोठें स्फुरण आलें व त्यानें दृढनिश्चयानें पुन्हां आपलें राज्य मिळविलें.

फार लांब कशाला? आपल्या हिंदुपदपादशाहीची स्थापना करणारे जे शिवाजीमहाराज त्याच्यावर थोडींका संकटें आलीं? मोठमोठे शूर सरदार, त्यांच्यावर मोठ्या

कठिण प्रसंगीं चालून आले. परंतु त्या सर्व संकटांस न जुमानितां त्यानीं आपलें देशहिताचें काम शेवटास नेलें हें दृढनिश्चयाचें फळ नव्हे असें कोण ह्मणेल?

**निश्चयाचें बळ । तुका ह्मणे हेंचि फळ ॥**

---

## उत्साह.



ज्याप्रमाणें कोणताही उद्योग पूर्णरीतीनें शेवटाला जाण्यास दृढनिश्चयाचें बळ अवश्य पाहिजे. त्याचप्रमाणें किंबहुना जास्त बळ या सद्गुणाचें असलें पाहिजे. फार काय ह्या गुणाला दृढनिश्चयाचा जनिता ह्मटलें असतांही बाध येणार नाहीं. मनुष्य कोणतेंही काम हातीं घेवो, त्याच्या अंगीं उत्साह असल्याशिवाय तें काम त्याच्या हातून कधींही पार पडणार नाहीं. आपल्याला सर्व कामांत यशप्राप्ती झाली नाहीं ह्मणजे आपण अगदीं निरुत्साह होतों व यावेळीं दृढनिश्चय कसा असतो हें आपल्या गावींही नसतें. परंतु जर का पुन्हां आपणाला उमेद आली तर दृढनिश्चय त्याच्यामागून ठेवलेलाच असतो. यावरून उत्साहाला मीं दृढनिश्चयाचा जनिता कां ह्मटलें याचें कारण आपल्या ध्यानात येईल व उत्साहाचें महत्व कळेल.

मन हें सर्व इंद्रियांचा राजा आहे, व तें जो जो हुकम फर्मावील, तो तो मान्य करणें हें प्रत्येक इंद्रियाचें काम आहे. आणि उत्साह हा एक मनाचा धर्म असल्याकारणानें जर मनासच स्वास्थ्य नाहीं तर इतर इंद्रियांकडून कामें

कशीं व्हावी. मनुष्य निरुत्साही झाला ह्मणजे त्याची चमत्कारिक स्थिती होते. त्याला आपण काय करितों काय नाहीं याची देखील खबर रहात नाहीं. अतिशय क्षुल्लक काम असून त्याला विशेष आयास पडत नसतांहीं, तें कोणत्यारीतीनें शेवटाला न्यावें याबद्दल त्यास एकही उपाय सुचत नाहीं. मग एकादें अवघड काम असलें ह्मणजे तर त्याच्या धादलीस पारावार नाहींसा होऊन प्रसंगीं त्याचें फार नुकसान होतें. यावरून या गुणाचें महत्व लक्ष्यांत येईल.

मनुष्याच्या सर्व सुखाचें साधन उद्योग हा होय, व उद्योगाची सिद्धी उत्साहावांचून होणें नाहीं. मनुष्य एकदां नाउमेद झाला ह्मणजे त्याला सर्व गोष्टींची अनुकूळता असतांही त्याच्या हातून कोणतेंही महत्कृत्य घडून येत नाहीं. परंतु एकादा अत्यंत दरिद्री मनुष्यही उत्साहाच्या योगानें मोठमोठीं कामें करून सौख्य पावतो व जगामध्यें मोठ्या कीर्तीस चढतो.

उत्साहाचें आपल्या शरीर प्रकृतीवरही विलक्षण प्रकारचें कार्य घडत असतें. जो मनुष्य नेहमीं निरुत्साह असतो त्याला कोणत्याही गोष्टीपासून संतोष होत नाहीं. यामुळें त्याचा स्वभाव फारच कुजका व आतल्या गांठीचा बनतो, यामुळें तो लोकांस आवडेनासा होऊन लोकामध्यें त्याचें वजन रहात नाहींसें होतें व त्याची जेथें तथें अप्रतिष्ठा होते. यामुळें व मन नेहमीं अप्रसन्न असल्यामुळें शरीराला एकप्रकारची ग्लानी येऊन मनुष्याच्या शरीरप्रकृतीस अपाय घडतो व तो लवकरच मृत्युपंथास जातो.

आंगीं उत्साह असला ह्मणजे मनुष्याच्या हातून काय न होईल याचें प्रत्यंतर वुइलियमदिकॉकरच्या हकीगती-

वरून सहज कळणार आहे. त्यानें इंग्लंददेशावर स्वारी कर-ण्याच्या उद्देशानें जहाज हाकारिलें व किनारा दृष्टीस पडतांच मोठ्या आनंदानें किनाऱ्यावर उडी टाकिली परंतु तेथें फार निसरडें असल्यामुळें तो तोंडघशीं पडला; याव-रून त्याचे लोक अपशकुन झाला असें समजून निराश झाले; परंतु वुइलियमनें मोठ्या उत्साहानें मातीचे भरलेले हात वर करून ह्मणाला, हें पहा " इंग्लंद माझ्या हातांत आलें आहे. " तेव्हा त्याच्या लोकांस हुरूप येऊन त्यांनीं इंग्लंद काबीज केलें.

एकेनापि सुवीरेण सोत्साहेन नृणंनति ।
सोत्साहं जायते सैन्यं भग्ने भग्नमवानुयात ॥ १ ॥

---

## दैव अथवा नशीब.

उद्योगिनं पुरुष सिंह मुपैति लक्ष्मीः ।
दैवेनदेयमिति का पुरुषा वदन्ति ॥
दैवं निहत्य कुरुपौरुषमात्मशक्त्या ।
यत्नेकृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ॥ १ ॥

एकाद्या कामात जराशी अडचण येताक्षणिच आळशी लोक निराश होतात व दृढनिश्चयानें पुन्हां प्रयत्न कर-ण्याचें सोडून देऊन मूर्खपणानें स्वस्थ बसतात व आपल्या नशीबाला दोष लावतात. कित्येक लोक इतके आळशी असतात कीं, ते कोणत्याहीप्रकारचा उद्योग न करितां यथास्थित दोनवेळ जेवून नशीबीं असेल तसें घडेल असें

ह्मणून स्वस्थ बसतात व अन्न मिळेनासें झालें ह्मणजे पश्चात्ताप पावतात.

वास्तविक पाहिलें असतां दैव ह्मणून कोणीएक कर्ता असून तो आपल्या इच्छामात्रेंकरून प्रत्येक मनुष्यास वाटेल तेव्हां दुःख देतो अशी मुळींच गोष्ट नाहीं. प्रत्येक मनुष्य जीं जीं चांगलीं अथवा वाईट कर्में करितो त्या त्या प्रमाणें त्याला इहजन्मीं अथवा अन्यजन्मीं गोड अथवा कडू फळें भोगावीं लागतात. ह्यांत दैवाचा बिलकूल संबंध नाहीं. "करील तसें भोगील" ही अगदीं प्रचारांतली ह्मण मी काय ह्मणतों याची साक्ष देईल. कांहीं लोक एकाद्या कामामध्यें यशप्राप्ती झाली असतां देवाचे मोठे उपकार स्मरून त्याचें अनन्यभावानें चिंतन करितात. परंतु जर कां अपयश आलें तर लागलेंच देवाची निर्भर्त्सना करीत सुटतात.

जर एकादा मनुष्य नशीबीं असेल तसें होईल असें ह्मणून एखाद्या अज्ञात पर्वताच्या शिखरावर जाऊन बसला तर त्याचें नशीब येऊन त्याला पोटाला घालील काय? अशी गोष्ट कधींही होणार नाहीं हें अगदीं निर्विवाद आहे. आतां कोणी असें ह्मणतात कीं, पूर्वजन्मीं जीं आपण बरीं वाईट कृत्यें करितों तेंच दैव. हें ह्मणणें सयुक्तिक आहे. कारण पूर्वजन्मींचीं कृत्यें असें ह्मणणें किंवा त्यांना दैव अशी संज्ञा देणें हें एकच नव्हे काय? दैव हें उद्योगाशिवाय अगदीं पंगू आहे. उद्योग हा गाड्याचीं चाकें होय व दैव हें गाड्यावरील सामान होय. यामुळें गाड्याचीं चाकें ह्मणजे उद्योग जेथें जेथें जाईल तेथें तेथें

नशीब हें जावयाचें. यामुळें उद्योगाशिवाय नशीबाला गत्यंतरच नाहीं.

मागील जन्मीं ज्याप्रमाणें आह्मीं पुण्य पाप आचरितों त्याप्रमाणें इहजन्मीं आपणास बरीवाईट स्थिती येते अशी जर गोष्ट आहे तर आह्मी कितीही उद्योग केला असतां काय फायदा होणार आहे असें कोणी ह्मणेल; परंतु हें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे. ख्रिस्तीधर्माप्रमाणें मनुष्याला एकच जन्म नसून आपल्या पवित्र हिंदूधर्माप्रमाणेंही मनुष्याला अनेक जन्म घ्यावे लागतात हें पुष्कळ कारणावरून सयुक्तिक दिसतें, याकरितां मागच्या जन्मांतील पापपुण्याचें फळ काहींचें तेव्हांच मिळतें व कांहींचें पुढील जन्मास शिल्लक उरतें; व त्याचप्रमाणें ह्या जन्मीं केलल्या बऱ्यावाईट गोष्टींचें फळ अंशतः ह्या जन्मीं व अंशतः पुढील जन्मीं मिळतें. एकाद्यानें अतीशय मूर्खपणानें कांहीं पदार्थ अति सेवन केल्यास त्याचे पोटांत दुखतें व हें जें प्रायश्चित्त त्याला मिळतें तें मागील जन्मींच्या पापाचरणाबद्दल नसून इहजन्मीच्या मूर्खपणाचें फळ होय असें कोण ह्मणणार नाही? यावरून मनुष्याला इहजन्मीं जीं बरींवाईट फळें भोगावी लागतात तीं सर्व मागील जन्मींच्या कृत्याशीं संलग्न नसून त्यांतील थोड्याबहुतांचा संबंध इहजन्मींच्या कृत्याशींही असतो, व त्याचप्रमाणें ह्या जन्मीं उद्योग केला असतां त्याचें फळ पुढील जन्मीं मिळण्याचा संभव आहे. याकरिता नशीबीं असेल तसें घडेल, असें ह्मणून निराश न होतां प्रत्येक मनुष्य सतत उद्योग करीत राहिल्यास जरी त्याला या जन्मीं कदाचित् यश आलें नाहीं तरी पुढील जन्मीं त्या उद्योगाचें फळ मिळेल.

अशी बळकट व साधार आशा धरून प्रत्येक मनुष्यानें नेहमीं फळाची आशा न करितां उद्योग करीत रहावें.

---

## टापटीप.

कोणतेंही काम व्यवस्थेनें व टापटीपीनें केलें असतां त्याला वेळ फार थोडी लागून मेहनतही वांचते. त्याच-प्रमाणें व्यवस्थेशीर काम करणारास कोणतेही प्रकारचा घोटाळा पडत नाहीं व त्याला बहुतकरून त्यांतच यश येतें. आपल्या लोकांमध्यें अशी एक वाईट संवय आहे कीं, कोणतेंही कार्य करण्यापूर्वी त्याबद्दल विचार ह्मणून करावयाचा नाहीं व बेधडक काम सुरू करावयाचें. यामुळें त्यामध्ये कोणत्याही प्रकारची शिस्त न राहून सर्व काम बिघडून जातें.

टापटीप ह्मणजे जेथली वस्तु तेथल्या जागीं ठेवणें एवढेंच नाहीं तर हरएक कामांत व्यवस्था पाहिजे. रोज अमुक काम अमुक वेळेस करावयाचें तर तें काम त्याच वेळेस झालें पाहिजे व तेंही व्यवस्थेनें. सर्व जिनसा जेथल्या तेथें त्या त्या जागेवर मोठ्या व्यवस्थेनें मांडून ठेविल्या पाहिजेत. असें केलें असतां आपणांस पाहिजे तो पदार्थ लागलाच सांपडतो, व त्यामुळें वेळेचा व्यर्थ व्यय न होतां कामाचा घोंटाळा होत नाहीं. भलती वस्तू भलत्या ठिकाणीं ठेविल्यापासून एखादे वेळीं फार भयंकर परिणाम होतात.

टापटीपीपासून मनुष्यांस उत्तमप्रकारच्या संवयी लागतात. व त्यांपासून त्याचें सर्वप्रकारें हित होतें. कित्येक मुलें व मनुष्यें फार अव्यवस्थित असतात, यामुळें त्याचः

सर्व लोकांना कंटाळा येतो. कोणी एखादा मनुष्य त्यांचे घरी गेल्यास, घरांत जिकडे तिकडे केर पडला आहे, सर्व सामान अस्ताव्यस्त होऊन पडलें आहे अशी स्थिती पाहून परतयास त्या मनुष्याचा कंटाळा येतो, आणि असें करण्यापासून त्या मनुष्याला तरी कांहीं फायदा होतो अशी मुदलींच गोष्ट नाहीं; उलट त्याचें फार नुकसान होतें परंतु सवयीचा प्रभाव फार असल्यामुळें मनुष्याचें तिच्यापुढें काही चालत नाहीं.

इंग्रज लोकांनीं आह्मांस टापटीपीचें अथवा व्यवस्थेचें उत्तम उदाहरण घालून दिलें असें ह्मणण्यास हरकत नाही. हजारों कोसावरून येऊन या हिंदुस्थानासारख्या अनोळखी देशांत वसाहती करून ज्या मूठभर इंग्रज बहादुरांनीं आमच्या हिंदुस्थानीं सेनासमुद्राचा धुव्वा उडवून देऊन अल्प काळामध्यें हिंदुस्थानासारख्या देशात एकछत्री राज्य सुरू केलें याचें कारण टापटीपीशिवाय दुसरें काय असणार? जरी एकी व अधिकारतृष्णेप्रमाणें दुसऱ्या अनेक गोष्टींनीं इंग्रजानीं युद्धकलेमध्यें आपली शिताफी दाखविली, तरी टापटीपीनें जें काम केलें तें दुसरें कशानेंही आलें नाहीं असें खुद्द इंग्रज अंमलदाराचें ह्मणणें आहे. आमचें सैन्य इंग्रजाच्या सैन्यापेक्षां शेंकडों पटीनें मोठें असतां आमचा जो प्रत्येक ठिकाणीं पराभव झाला तो टापटीपीच्या अभावानें झाला यांत तिळमात्र संशय नाही. इंग्रज सैन्याला कवाइतीच्या योगानें उत्तम-प्रकारची शिस्त लागली असल्या कारणानें जरी त्यांचा एकादे वेळीं पराभव झाला तरी ते रानोमाळ न पळतां मोठ्या व्यवस्थेनें मागें फिरत, व पुन्हां तयारी करून येत.

यामुळें त्यांचा नेहमी जय होत असे आणि आमचें वर्तन याच्या अगदीं उलट असल्यामुळें पुष्कळ सैन्य असूनही कांहीं फायदा होत नसे. यासाठीं आपल्या देशाचा उदय व्हावा असें ज्यास वाटत असेल त्यानें आपल्या वर्तनानें दुसऱ्यांस टापटीप शिकवावी.

---

## स्नेह.

---

पापान्निवारयति योजयते हिताय ।
गुह्यंच गूहति गुणान् प्रकटी करोति ॥
आपद्गतं नच जहाति ददाति काले ।
सन्मित्र लक्षणमिदं प्रवदन्ति संतः ॥ १ ॥

आपल्याला अतीशय सुख अथवा अतिशय दुःख झालें असता तें दुसऱ्याजवळ प्रगट केल्यावांचून आपलें क्षुब्ध झालेलें मन शांत होत नाही. यामुळें आपल्याला एखादा जिवलग मित्र जोडणें फार अवश्य आहे. ज्या मनुष्यास मित्र नाही त्या मनुष्यास कधींही सुख होणार नाहीं. मित्र हा आपल्या सुखदुःखाचा समान विभागी आहे यामुळें आपलीं सुखदुःखें त्याला सांगितलीं असतां आपला आनंद दुणावतो व दुःख हलकें होतें.

जोंपर्यंत आपल्याजवळ पैसा रगड आहे व जोंपर्यंत खाण्यापिण्याची चंगळ असते तोंपर्यंत आपणाभोंवतीं पुष्कळ मित्र जमतात व मोठी कळकळ व प्रसंगीं दुःख दाखवून सर्व वित्ताचें हरण करितात व कफल्लक झालों म्हणजे उलट आपल्यावरच वसरून आपली फजीती करितात. असले

मित्र काय कामाचे ? त्यापेक्षां आपले शत्रूं हजारपटीनें बरे. कारण ते आपला उघड उघड द्वेष करितात. परंतु हे वरकणीं मित्र बाहेरून गोड बोलून अखेरीस आपला नाश करितात. याकरितां प्रत्येक मनुष्यानें जो मित्र निवडायचा त्याची अगदीं पूर्ण परीक्षाकरून मग निवडावा व असल्या मित्रालाच आपलीं सर्व कृत्यें उघडकरून सांगावीं ह्मणजे त्याचा नाश होणार नाहीं.

ज्याप्रमाणें संगती असते त्याप्रमाणें आपणांस फळें मिळतात. चांगल्याची संगत धरली असतां आपला स्वभावही चांगला बनतो व आपला शेवटही गोड होतो. व वाइटाची संगत धरिली असतां आपलाही स्वभाव त्याचेप्रमाणेंच वाईट बनतो व कधीं कधीं आपला तिळभरही अपराध नसतां फक्त संगतीसंगदोषानें आपणास व्यर्थ प्राणास मुकण्याची पाळी येते. यामुळें स्नेह करितांना सागमार विचार करावा व वाईट लोकांच्या वाऱ्यासही उभें राहूं नये.

आपल्याला जो मित्र निवडावयाचा तो आपल्या वयाचा, आपल्या जातीचा व आपल्या स्वभावाचा असला पाहिजे. कारण असें जर होईल तरच दोघांची खरी मैत्री जमून त्याचें कल्याण होईल. याकरितां मित्राची निवड करितांना प्रत्येकानें फारच सावधगिरी ठेविली पाहिजे. कुसंगत परिणामीं हानिकारक होते याप्रमाणें एकदा मित्र निवडला ह्मणजे आपले सर्व मनोगत त्याला सांगावें व त्याचा हरएक कामांत सल्ला घ्यावा असें केलें असतां आपलें कल्याण होतें. आपल्या जिवलग स्नेह्याशीं देखील

अतिप्रसंग करूं नये कारण त्यामुळें एकादेवेळीं आपले मित्रच कट्टे शत्रू होतील व आपला नाश होईल.

कितीही पैसा मिळवा, सत्ता चालवा, पण जर तुह्मांस मित्र नाहींत तर हा सर्व खटाटोप व्यर्थ आहे. तुह्मास जर हें सर्व सांगून आपल्याप्रमाणें त्याचें मन आनंदीत करण्यास कोणी नाहीं, तर तुमचा जन्म व्यर्थ होईल हें पक्कें लक्षांत ठेवून प्रत्येक मनुष्यानें मित्र निवडण्याचें काम आधीं करावें. कोणी ह्मणेल कीं आमचें हृद्गत कळविण्यास मित्रच कशास पाहिजेत, आमचे आईबाप त्याहून काय कमी कळकळीचे असतात, तर त्यानांच कां आह्मीं विशेष आपलेसें करून घेऊं नये. बरोबर आहे कीं, आमचे आईबाप कळकळीचे असतात परंतु अशा कांहीं नाजूक गोष्टी आहेत कीं त्या मित्रावांचून दुसऱ्यास कळविणें हेंच आधीं होणें नाहीं मग त्याना विचारून त्यांचा सल्ला घेणें हें किती दुरापस्त? मनुष्य आपल्या गांवापासून जितका जितका लांब जाईल तितकी तितकी त्याला मित्रांची अवश्यकता फार वाटत असते.

---

## नेमस्तपणा.

नेमस्तपणा हा गुण सर्व सुखाचें माहेरघर आहे असें ह्मटल्यास चिंता नाहीं. शारीरिक अथवा मानसिक सर्व-प्रकारच्या व्याधी ह्या गुणाच्या अभावीं घडून येतात. यासाठीं प्रत्येक मनुष्यानें सर्व बाबतींत नेमस्तपणा ठेविला

असतां त्याला कोणत्याहीप्रकारची व्याधी न जडतां त्याचें सर्व आयुष्य सुखानें जाईल.

मनुष्यजन्म हा सर्व जन्मांमध्यें श्रेष्ठ आहे, याचें कारण सर्व प्राणिमात्रापेक्षां त्याचे आंगीं एक विशेषप्रकारची शक्ती ह्मणजे बुद्धी आहे हें होय. ज्याअर्थी ईश्वरानें दयाळु होऊन मनुष्यांस ही अद्भुत शक्ति दिली आहे, त्याअर्थी तिचा योग्य उपयोग करणें हें त्याचें कर्तव्यकर्म होय. बुद्धिहीन पशुपक्षीही आपल्या आहाराच्या बाहेर कधींही खात नाहींत; आणि मनुष्यप्राणी विचारी असूनही व त्याला इतर प्राण्यापेक्षां आपल्याबद्दल विशेष काळजी असूनही ज्याअर्थी तो सुखांत दंग होऊन प्रकृतीचा व आयुष्याचा भंग स्वहस्तें करून घेतो त्याअर्थी तो पशुपक्ष्यापेक्षांही अविचारी असला पाहिजे यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें ईश्वरानें मनुष्यांस जो नरदेह देऊन विचारशक्ति दिली आहे त्याचा उपयोग केवळ स्वार्थासाठीं नसून होतांहोईलतों दुसऱ्यांवर उपकार करण्यास दिला आहे, ह्यासाठीं मनुष्यानें नेमस्तपणा राखून आपलें व दुसऱ्यांचें कल्याण करण्यास शरीर मजबूत ठेवावें.

मनुष्यप्राण्याची शरीररचना केवळ घड्याळाच्या रचनेप्रमाणें आहे ह्मटल्यास चालेल. जर घड्याळाला किल्ली देतांना एकादा वळसा जास्ती झाला तर लागलेंच मुख्य तार ( कमान ) तुटून तें बिघडून जातें व पुन्हां नीट करण्यास महत्प्रयास पडूनही तें जसें व्हावें तसें होत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या शरीराची गोष्ट आहे. एकादा पदार्थ आपल्याला आवडला ह्मणून जर आपण

भुकेपेक्षां एकादा घास जास्त खाला तर लागलेंच आपल्या प्रकृतीस असमाधान वाटूं लागून आपले हातून कांहींही उद्योग होत नाहीं. यामुळें प्रत्येक मनुष्यानें भुकेपेक्षां एक घांस कमीच जेवावा ह्मणजे त्यापासून त्याचें हित होईल.

"अती तेथें माती" ही ह्मण सर्वत्र लागू पडते. मनुष्यानें कोणत्याही बाबतींत जर नेमस्तपणाचा अवलंब केला नाहीं तर तात्काल अथवा काळेंकरून त्याचा नाश व्हावयाचाच. मनुष्याला विचारशक्ती असूनही त्याच्याकडून नेमस्तपणा राखवत नाहीं. याचें कारण त्याचा अनावर आधाशीपणा अथवा सुखोपभोगेच्छा हें होय. मनुष्यानें आपल्या बुद्धीप्रभावानें खाण्यापिण्याच्या वगैरे सर्व बाबतींत सुधारणा करून सुखसमृद्धी करून ठेविली आहे, व तीं सर्व सुखें उपभोगण्याचा मनुष्याला हक्क आहे. परंतु मनुष्याला आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवण्याची शक्ती नाहीं. यामुळें तीं सुखासक्त होऊन मनुष्यांचा नाश करितात, याकरिता प्रत्येक मनुष्यानें सावध राहून सर्व इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवून घेऊन त्यांच्याकडून नेमस्तपणानें काम करून घ्यावें ह्मणजे तो सुखी होईल.

आपल्या लोकांमध्यें दुसऱ्याचे घरीं जेवण्यास गेलें असतां आग्रह करून वाढण्याची दुष्ट चाल पडली आहे व ह्यायोगें अपरिमित नुकसान होत आहे. जो मनुष्य आग्रह करून वाढीत नाहीं त्याला चिक्कू अशी संज्ञा मिळते. यामुळें लोक जनरीतीस भिवून मनांतून नसतांही एकादेवेळेस त्याच्याकडून प्रमाद घडतात; व त्याचप्रमाणें वैदिकांना आग्रह करण्याची चाल तर कांहीं विलक्षण आहे. ब्राह्मणांस आकंठ भोजन घातल्याशिवाय त्यांचे पितर

स्वर्गासच जात नाहींत त्याला ते तरी काय करतील. परंतु ही फार घातुक चाल आहे यास्तव ती बंद केल्यास लोकांचा फार फायदा होईल यांत संशय नाहीं.

तेलंगी ब्राह्मणाविषयीं तर अशी चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं, ते ब्राह्मण आधीं दोन दिवस व नंतर दोन दिवस कोठेंही जेवायाला जायचें असलें ह्मणजे उपास काढितात; व याचा परिणाम असा होतो कीं, ते ब्राह्मण जेवल्यानंतर डोलींत घालून पाठवून द्यावे लागतात किती-एक ब्राह्मण तर या पायीं आपल्या आवडत्या प्राणासही मुकतात. काय अनर्थ हा !

पारशी लोक नेमस्तपणाविषयीं प्रसिद्ध आहेत. ते आपलें अन्न नियमितवेळीं मापून घेतात ह्मणूनच ते लोक अजीर्णामुळें गत झाले असे फारच क्वचित. किंबहुना नाहींच ह्मटलें तरी चालेल.

---

## स्वच्छपणा.

इहलोकीं जीं मनुष्याचीं कर्तव्यें आहेत त्यां पैकीं स्वच्छ-पणा राखणें हें एक अति महत्वाचें कर्तव्यकर्म आहे. स्वच्छपणा ठेविल्या पासून आपणास व आपल्या शेजाऱ्यांस सुख होऊन आपलें मन नेहमीं प्रफुल्लित असतें व आपणास कोणत्याही प्रकारची व्याधी जडत नाहीं.

समाजांतील जर कांहीं मनुष्यें गलिच्छपणानें वागून हरएक प्रकारची घाण करूं लागलीं तर अल्पकाळांतच त्या घाणी पासून प्राणहारक अशीं साथीचीं बीजें उत्पन्न होतात व तीं बीजें वाऱ्यानें उडून जाऊन पाण्यांत प्रवेश करितात,

व अन्य तऱ्हेनेंही तीं बीजें मनुष्याच्या शरीरांत शिरून गलिच्छ मनुष्यांचा व स्वच्छपणा ठेवणाऱ्या मनुष्यांचाही नाश होतो यामुळे "करावें एकानें व भोगावें दुसऱ्यानें" या न्यायानें निरपराधी मनुष्येंही असल्या प्रकारच्या सांथीला बळी पडून थोड्याशा लोकांच्या गलिच्छपणामुळें समाजाचा नाश होतो, व त्याचें पाप त्या घाणेरड्या लोकांच्या माथीं येतें. यास्तव समाजशत्रु होऊन सगळ्यांचा नाश विनाकारण न करितां प्रत्येक मनुष्यानें स्वच्छपणानें वागावें ह्मणजे आपलें व समाजाचें कल्याण होईल.

स्वच्छपणा राखिल्यापासून मनाला एकप्रकारची हुषारी येऊन काम करण्यास हुरूप येते. यामुळें प्रत्येक मनुष्यानें निर्मळ पाण्यानें स्नान करून स्वच्छ कपडे वापरावे व पिण्याचें पाणी वगैरे स्वच्छ असावें. घराला पुष्कळ खिडक्या व गवाक्षें ठेवून स्वच्छ हवेचा पुरवठा करावा ह्मणजे मनुष्य निरोगी व सशक्त होतो.

कांहीं लोक गरीबीची सबब सांगून घाण कपडे वापरतात. परंतु या सबबीस कांहीं अर्थ नाहीं. आपल्या आळसामुळें आपल्याला स्वच्छपणा ठेववत नाहीं असें त्यानें ह्मटलें असतां विशेष सयुक्तिक दिसेल. कितीही जरी गरीब मनुष्य असला तरी जर त्यानें स्वच्छपणा राखण्याचें मनावर घेतलें तर तें त्याला कधींही अशक्य होणार नाहीं फक्त त्यानें आळस मात्र सोडला पाहिजे. स्वच्छपणा राखण्यास श्रीमंतीची मुद्दलींच जरूरी नाहीं. पाणी पाहिजे तितकें श्रीमंतास व गरीबास फुकट मिळतें आतां स्वच्छ

---

१ खलः करोति दुर्वृत्तं तद्धि फलति साधुषु ।

कपडा ह्मणजे मोठा भरजरी अथवा किनखापी असला पाहिजे अशी मुद्लींच गोष्ट नाहीं. खादीची फाटकी बंडीही धुतल्यास स्वच्छ होते; व त्याचप्रमाणें कित्येक श्रीमंत लोक हवा तितका पैसा खर्चण्याचें सामर्थ्य असतांही घाणेरडे कपडे वापरतात; यावरून असें सिद्ध होतें कीं, स्वच्छपणा राखणें किंवा न राखणें हें गरिबीवर अथवा श्रीमंतीवर अवलंबून नसून ज्याच्या त्याच्या मनाच्या कलावर आहे.

अलीकडे इंग्रजलोकांचें राज्य झाल्यापासून समाज स्वच्छतेचें काम पूर्वीपक्षा विशेष व्यवस्थेनं चालतें. याचें कारण सरकारानें तें काम स्वतःच्या शिरावर घेतलें आहे हें होय. प्रत्येक घरापासून कांहीं नियमित पैसा घेऊन त्या खर्चामध्यें शहर सफाई वगैरे कामें सरकार करितें. यामुळें समाजाचे श्रम वांचून सगळ्याचा फायदा होतो

स्वच्छपणासंबंधानें आपल्या लोकामध्यें जो एक गैरसमज आहे तो येथें सांगितल्यावांचून राहवत नाहीं. आपल्या लोकांमध्यें व विशेषेंकरून बायकांमध्यें सोंवळ्याचा फार बडेजाव आहे. वास्तविक पाहिलें असतां सोंवळ्याचा खरा अर्थ स्वच्छपणा होय. परंतु अलीकडे त्याचा भलताच अर्थ होऊन गेला आहे. धुतल्या स्वच्छ धोतरास ओंवळ्यानें बोट जर लागलें तर लागलेंच तें धोतर विटाळतें व तोच एखादा तागी अथवा रेशमी मुकटा सहा सहा महिनें धुतला नाहीं तरी चालतो. असला धर्मभोळेपणा आपल्यामध्यें आहे ह्मणूनच आपलें नुकसान होत आहे. तसेंच एखाद्या हीन जातीच्या मनुष्यानें स्वच्छ भांड्यातून निर्मळ पाणी आणून एखाद्या

सोंवळ्या ब्राह्मणास दिलें असतां तें पाणी तो कधींही घेणार नाहीं पण तेंच एखाद्या ब्राह्मणानें गलिच्छ भांड्यांतून वगैरे जरी पाणी आणून दिलें तरी तो मोठ्या आदरानें त्याचा स्वीकार करील. असल्या तऱ्हेचा हा धर्म भोळेपणा आमच्यांतून आधीं गेला पाहिजे, ह्मणजे काहीं तरी देशोन्नति होण्याचा संभव आहे.

---

## व्यायाम.

जरी शरीरसंपत्तीपेक्षां ज्ञानसंपत्तीचें माहात्म्य जास्ती आहे तरी पहिलीची चांगल्यारीतीनें जोपासना केल्याशिवाय दुसरीचा काहींही उपयोग होणार नाहीं हें अलीकडील कॉलेज्यांत शिकून सुशिक्षित झालेल्या परंतु शरीराची काळजी न घेतल्यामुळें कर्तृत्वहीन झालेल्या लोकांच्या उदाहरणावरून दिसून येईल. मनाचें पोषण शरीराकडून होतें, यामुळें जर शरीरालाच स्वास्थ्य नाहीं तर ज्ञानसंपत्तीची काय मातब्बरी उरणार ? याकरिता ह्मणजे हे दोन्ही हेतू साध्य होण्यासाठीं व्यायाम अवश्य केला पाहिजे.

एखादें यंत्र बरेच दिवस उपयोग न करिता ठेविलें असता ज्याप्रमाणें तें बिघडून कुचकामाचें होतें त्याचप्रमाणें आपण जर व्यायाम केला नाहीं तर काहीं दिवसांनीं आपणास अनेक व्याधी जडून आपलें फार नुकसान होईल. व्यायाम केला असता आपलें आंग चपळ होऊन मनास आनंद होतो व त्यामुळें उद्योग करण्यास हुरूप येतो. व्यायामानें अन्नाचें पचन होऊन अंगात शक्ती येते व कोणताही रोग जडत नाहीं. याकरिता मनुष्याच्या

सर्वसुखाचें साधन जो व्यायाम त्याचा सर्वांनी अवलंब करावा.

कांहीं जुन्याचे अभिमानी लोक असें ह्मणतात कीं, आतांच्या सुधारलेल्या लोकांनीच क्रिकेट, टेनीस वगैरे खेळ काढून व्यायामाचें नसतेंच बंड उठविलें आहे, असें असून सर्व लोक उलट अशक्तच होत चालले आहेत; आणि पूर्वीचे लोक व्यायाम वगैरे न करितां इतके मजबूत होते कीं त्याकाळचा एक मनुष्य आतांच्या दहाविस माणसांस भारी; त्याचें ह्मणणें जरी वस्तुतः खरें आहे तरी दुरभिमानानें त्याचा समज चुकीचा झाला आहे. पूर्वी क्रिकेट वगैरे खेळ नसताही लोक फार सशक्त होते आणि तसे खेळ असतांही आतां लोक अशक्त आहेत ही गोष्ट अक्षरशः खरी आहे परंतु अशी स्थिती होण्यास अनेक कारणें आहेत. त्या कारणाचा ते कधींच विचार करीत नाहींत. पूर्वींच्या आणि आताच्या काळांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. तेव्हा लोक स्वतंत्र व सांग्रामिककालाचा अमल असल्याकारणानें "हमकरेसो कायदा" हें तत्व जारीनें प्रचारात होतें व दरवडे आणि खून फार याकरिता प्रत्येक मनुष्य चोरांकडून आपलें संरक्षण करून घेण्याकरितां अथवा राजाकडून शिफारस मिळविण्याकरितां किंवा स्वतःच पुंडाई माजविण्याकरितां दाडपट्टा खेळणें व तरवार फिरविणें यांसारखे मर्दानी खेळ खेळत होते व स्वराज्य असल्यामुळें हवें तसलें पौष्टिक खाणें स्वस्त मिळे व त्याचप्रमाणें दुसऱ्या अनेक कारणानें पूर्वींचे लोक आतांपेक्षां सशक्त होते. आतां त्या सर्वच गोष्टी लयास गेल्यामुळें प्रजा उत्तरोत्तर अशक्त निपजूं लागली आहे. याचें कारण

व्यायामाकडे दोष नसून त्याला आह्मींच दोषास पात्र आहों.

व्यायाम करावयाचा तो सकाळीं अथवा सायंकाळीं करावा. मात्र जेवण झाल्यावरोबर कधींही करूं नये कारण त्या योगानें अन्न पचनास व्यत्यय येऊन शरीरास इजा होते. सकाळचे प्रहरीं जोर, उठाबशा व मलखांब वगैरे कसरत करावी व सायंकाळचे वेळीं आपल्या शक्तीप्रमाणें फुटबॉल वगैरे खेळ खेळावे ह्मणजे मनास हुषारी येऊन शरीर निरोगी होतें.

## संवय.

कोणतीही गोष्ट आपल्या अगदीं अंगवळणीं पडून ती केल्यावांचून चैन पडेनासें होतें, असें झालें ह्मणजे त्यास संवय असें ह्मणतात. मनुष्याला लहानपणापासून एक एक संवय जडत जाते व अशा संवयीच्या समुदायानेंच मनुष्याचा स्वभाव बनत असतो. एकदां मनुष्याचा स्वभाव बनला ह्मणजे तो फारच महत्वाच्या कारणाशिवाय बहुतकरून बदलत नाहीं व वाईट स्वभावापासून आपलें फार नुकसान होतें. याकरिता प्रत्येक मनुष्यानें चांगल्या संवयी लावून घेणें हें फार महत्वाचें आहे.

चांगल्या अथवा वाईट संवयी मनुष्याला लागतात त्या बहुतेक लहानपणींच लागतात व तेव्हापासूनच मनुष्याचा स्वभाव बनूं लागतो याकरितां अशावेळीं प्रत्येक मुलाच्या आईबापानें आपल्या मुलाविषयीं फार काळजी घेतली पाहिजे. लहानपणीं मनुष्य जसा वळवावा तसा

वळतो. याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपल्या मुलांस वाईट संवयी न लागूं देण्याबद्दल मोठी दक्षता ठेविली पाहिजे. ह्या वयांत मुलाना चांगलें वाईट कांहीं समजत नाहीं या मुळें जशी त्याना संगत असेल त्याप्रमाणें त्यांना चांगल्या अथवा वाईट संवयी लागतात. ह्मणून प्रत्येक मनुष्यानें मुलांवर उत्तम प्रकारची देखरेख ठेवून त्यांना वाईट संगत न लागेल अशी तजवीज करावी व त्याचप्रमाणें जर आपल्या मुलाची वाईट वर्तणूक दिसून आली तर त्याला धाक दाखवून उपदेश करून अथवा बाबापुता ह्मणून कोणत्याही तऱ्हेनें त्याची संवय घालविली असतां त्याचा स्वभाव उत्तम बनून पुढें त्याचें कल्याण होईल

ज्याप्रमाणें सर्वप्रकारचीं मिष्टान्नें सोडून व्यसनी मनुष्य मद्याकडे धाव घेतो त्याप्रमाणें मनुष्याचें मन चांगल्या गोष्टी-पेक्षां वाईट गोष्टींकडे विशेष लवकर वळतें व त्याचप्रमाणें वाईट संवय तेव्हांच जडते, परंतु तिचा त्याग करण्यास फार प्रयास पडतात आणि तीच चांगली संवय आंगवळणीं पडण्यास फार श्रम होतात, परंतु तिचा त्याग करण्यास फारसा वेळ लागत नाहीं. याकरितां प्रत्येक मनुष्यानें वाईट संवयीचा त्याग करून आरंभीं कडू, पण परिणामीं हितकर अशा चांगल्या संवयींचा अवलंब करावा.

संवयीचा पगडा मनुष्यांवर कितपत आहे व त्यायोगानें मनुष्याचा स्वभाव किती बदलतो हें खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल—प्यारीस शहरीं एका मनुष्यास पन्नास वर्षेपर्यंत अंधारकोठडींत ठेविलें होतें पण जेव्हां तो त्यांतून मुक्त होऊन घरीं आला; तेव्हां त्याला मंडळींत उठणें, बसणें अथवा बोलणें आवडेनासें झालें व

त्यानें पुन्हां आपल्यास पूर्व मार्गी नेऊन ठेवण्याविषयीं आपली इच्छा दर्शविली!

लहानपणीं मुलांवर योग्य दाब न ठेविल्यामुळें त्यांना वाईट संवयी लागून तीं दुर्गुणी निपजतात व पुढेंमागें आपल्या बापाबरोबर भांडण्यासही मागेंपुढें पहात नाहीत. दुर्दैवेंकरून अशीं उदाहरणें आपल्या समाजामध्यें बरींच दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं आहेत हें आपलें दुर्भाग्य होय. ह्याचा परिणाम दुसऱ्या मुलांवर होऊन समाजाचें फार नुकसान होईल. याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपल्याविषयीं काळजी घेणें फारच अवश्य आहे.

---

## कर्तव्यकर्म.

---

मनुष्यप्राणी जन्मास आल्यापासून तों मरेपर्यंत त्याच्यामागें कांहींना कांहीं व्याप असतोच. बाळपणीं अज्ञानामुळें त्याला कर्तव्यकर्माची ओळखही असत नाहीं. आणि त्याचा सर्वकाळ खेळण्यांत जातो. तरुणपणीं अंगातील गुर्मीमुळें कोणताही हितोपदेश न ऐकतां आपलाच हेका चालवितो; व आपल्या कर्तव्यकर्मास विसरून जातो. व वृद्धपणीं शक्तिहीन झाल्यामुळें इहलोकचें सार्थक त्याच्याकडून होत नाहीं. परंतु मरणकाल जेव्हां समीप येऊन टपतो तेव्हां सर्व गोष्टींची आठवण होऊन त्याला दुःख होतें व नंतर तो पश्चात्ताप करूं लागतो.

पण मरण हें कोणासही चुकलेलें नाहीं. उपजलेला प्राणी अथवा निर्जीव वस्तूही कोट्यावधी वर्षांनें कां होईना त्यांचा नाश होणारच; मनुष्यप्राणी हा

ज्ञानबलेंकरून सर्व प्राण्यांत श्रेष्ठ आहे. त्याप्रमाणें त्याच्यावर जबाबदारीही पुष्कळ आहे. याकरितां आयुष्य हें क्षणभंगुर मानून व आपल्या शिरावरची जबाबदारी ओळखून प्रत्येक मनुष्यानें कर्तव्यकर्माकडे फारच लक्ष्य पुरविलें पाहिजे. नाहींतर आह्मीं ह्या श्रेष्ठ जन्माचा कांहीही उपयोग न केल्यामुळें देवाच्या घरीं अपराधी ठरूं.

मनुष्यप्राणी मग तो कोणत्याही जातीचा अथवा दर्जाचा कां असेना त्याच्यामागें कर्तव्यकर्म ह्मणून कांहीं आहेच. त्यावांचून त्यास गत्यंतरच नाहीं. पशुपक्ष्यादि जन्मल्यापासून कांहीं दिवस परतंत्र असतात; परंतु त्यांच्या अंगांत शक्ति आल्याबरोबर आईबाप व आप्तइष्ट सर्व सोडून स्वच्छंदानें जिकडे भक्ष्य सांपडेल तिकडे ते पळत सुटतात. आतां ही गोष्ट अज्ञानानें होते, परंतु मनुष्याचें तसें नाहीं. ईश्वरानें सर्व जगामध्यें श्रेष्ठ अशा अलभ्य ज्ञानसंपत्तीस मनुष्याच्या स्वाधीन करून ठेविलें आहे. तस्मात् त्यानें जर असें अयोग्य वर्तन केलें तर मनुष्यांत आणि पशूंत भेद तो काय उरला?

मनुष्य जन्मास आल्यापासून त्याला थोडेंबहुत समजूं लागेपर्यंत त्याला सृष्टीचें कोणत्याहीप्रकारचें ज्ञान नसतें. परंतु, तो जसजसा समजूतदार होऊं लागतो तसतसा त्याच्यामागें कर्तव्यकर्माचा जोर लागूं लागतो. त्याचें पहिलें कर्तव्य ह्मणजे ज्यानीं आपणांस जन्म दिला व ज्यानीं आपल्या दुःखाकडे न पाहतां आपला परोपरीनें सांभाळ केला त्याची आज्ञा पाळणें व त्याना सर्वप्रकारेंकरून सुख होईल असें वर्तन ठेवणें हें होय.

त्याचें दुसरें कर्तव्य मनापासून विद्यार्जन करणें हें

होय. विद्या शिकल्यापासून सर्व बाजूंनीं त्याचें मन सुसंस्कृत होऊन मोठेपणीं त्याला ती फार उपयोगीं पडते. विद्येपासून त्याच्या सर्व दुर्गुणांचा लोप होऊन त्याची मानमान्यता राहते; व विद्येच्याच योगानें ज्यानें ही अखिल सृष्टी निर्माण केली त्या ईश्वराकडे त्याचें मन लागतें त्यायोगानें त्याचे आयुष्यातील सर्वांत महत्वाचें जें कर्तव्यकर्म तें विद्येपासून साध्य होतें, याकरितां विद्या शिकणें हें अति महत्वाचें कर्तव्यकर्म होय.

यानंतर विद्या शिकून मोठा झाल्यावर जेव्हां कुटुंबाचा भार वाहण्यास तो योग्य होतो तेव्हां त्याच्या शिरावर फार जबाबदाऱ्या येतात. त्यानें तारुण्यमदानें अंध न होतां आईबापाचा योग्य सन्मान ठेविला पाहिजे. आपल्या मुलांना विद्या शिकवून त्याना उत्तमप्रकारचें वळण लाविलें पाहिजे; व त्याचप्रमाणें कुटुंबांतील सर्व माणसांशीं व स्नेह्यांशीं सलोख्यानें वागून व्यवहारामध्यें प्रामाणिकपणानें वागलें पाहिजे.

याच्याहीपेक्षा पोक्त झाल्यानंतर त्यानें आपल्या देशाचें कल्याण करणें हें त्याचें कर्तव्यकर्म होय. ज्या देशामध्यें आपला जन्म झाला त्या देशाचा आपल्याला काहींतरी अभिमान असलाच पाहिजे; व त्यांतील सर्व लोकास देशबंधु म्हणून त्यांच्यावर ममता करणें हें आपलें कर्तव्यकर्म होय.

सरतेशेवटलें परंतु अति महत्वाचें कर्तव्य म्हणजे ज्यानें ही अद्भुत सृष्टी निर्माण केली व ज्यानें आपणांस ज्ञानासारखी अमोल्य देणगी देऊन आपल्याविषयींचें ज्ञान करून दिलें त्याचें अनन्यभावानें चिंतन करून त्याला शरण जावें हें होय.

आहार निद्रा भय मैथुनंच ।
सामान्य मेतत्पशुभिर्नराणाम् ॥
धर्मोहि तेषां अधिको विशेषो ।
धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ॥ १ ॥

## वेळेचें महत्व.

वेळ ही काय वस्तू आहे याचें वास्तविक ज्ञान होणें मोठमोठ्या पंडितांसही दुर्घट आहे मग आह्मांसारख्याची कथा ती काय? इंग्लंदातील प्रसिद्ध तत्ववेत्त्यादिकांनीं व आमच्या प्राचीन वैदिक ऋषींनीं हें गूढ उकलण्याबद्दल फार खटपट केली, परंतु वेळ ही आदि अंतरहित एक वस्तू आहे ह्या खेरीज त्यांना कांहींहीं माहिती मिळाली नाहीं व हर्बर्ट स्पेन्सर तर हें गूढ कधींही उकलणार नाही असें ह्मणतो. यावरून वेळे विषयीं विचार करणें मानव शक्तीच्या बाहेर आहे हें उघड आहे.

वेळ ही अनादिसिद्ध कांहींही वस्तू असली तरी ती आपल्यास फार उपयोगी आहे हें खरें आहे. वेळ ही मनुष्य प्राण्याच्या उत्पत्ती पूर्वी—अगणित काळापूर्वी—होती व पुढेंहीं अनंत वर्षेपर्यंत असणार. परंतु आह्माला त्या सर्व वेळेशीं कांहीं करावयाचें नाहीं. आमच्या आयुष्यांतील जी वेळ त्या वेळेचा सद्व्यय केला ह्मणजे झालें.

मनुष्यानें दिवसा श्रम करावे व रात्रीं विश्रांती घ्यावी एतदर्थ दिवस व रात्र ईश्वरानें निर्माण करून मनुष्याच्या उपयोगाकरितां वेळेचे आयतेच विभाग पाडिले आहेत.

व ह्या दिवसरात्रीमध्यें कामाच्या सोई करितां मनुष्यानें तास, घटिका व पळें असे विभाग पाडविले आहेत. याचा उपयोग आपल्या आयुष्यांतील किती काळ गेला हें समजून येऊन व गेलेला काळ पुन्हां परत येत नाहीं याचें ज्ञान करून देण्यास होतो.

मनुष्याचें आयुष्य अगोदर शंभर वर्षें आहे. आतां प्रत्येक मनुष्य शंभर वर्षें वांचतो असा नियम नाहीं. ह्या शंभर वर्षांतील पन्नास वर्षें झोंपेंत जातात व बाकीची बाळपणाच्या खेळांत, तरुणपणाच्या धुंदींत, अथवा आजारपणाच्या व्याधींत जाऊन वेळ फुकट दवडल्यासारखें होतें व आपल्या आयुष्याचें सार्थक न होतां तें फुकट घालविल्यासारखें होतें. याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपल्याला समजूं लागल्यापासून एक क्षणाचाही अपव्यय न करितां जेणेंकरून आपलें स्वतःचें व एकंदर जगाचें कल्याण होईल त्या गोष्टीमध्यें आपल्या वेळेचा व्यय करावा हें उत्तम होय.

आपलें आयुष्य पाण्यावरील बुडबुड्या प्रमाणें क्षणभंगुर आहे. व आपण आळशी राहिलों ह्मणून वेळ कांहीं आपल्या साठीं थांबून रहात नाहीं. ती एकसारखी मरणाच्या मागीत पुढेंच धांव मारणार. एक पळही जर व्यर्थ गेलें तर तें पुन्हां आपल्यास लाभणार नाहीं असें आपल्या आयुष्यांतील वेळेचें महत्व आहे एकवेळ मृत माणूस परत येईल; परंतु वेळ परत यावयाची नाहीं.

जीं मुलें आपल्या लहानपणाच्या अमोलिक वेळेचा अपव्यय करून अभ्यासाकडे दुर्लक्ष करितात त्यांना मोठेपणीं फार हाल भोगावे लागतात. लहानपणीं मनास कोण-

तीही काळजी नसल्यामुळें अभ्यास जसा उत्तम होतो तसा तो मोठेपणीं होत नाहीं. याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपले आयुष्यांतील मौल्यवान् वेळेचा सद्व्यय केला असतां त्याचें निरंतर कल्याण होईल.

श्वःकार्यमद्यकुर्वीत पूर्वाण्हे चापराण्हिकम् ॥
नहि प्रतीक्षते मृत्युःकृतमस्य नवाकृतम् ॥ १ ॥

---

## शरीरसंपत्ती



या जगामध्यें मनुष्याचें आयुष्य सुखानें जाण्यास संपत्ती, ज्ञान व शरीरबल हीं अवश्य आहेत. जरी ज्ञानाचें महत्व या सर्वांमध्यें आहे तरी शरीरसंपत्ती चांगली असल्याशिवाय ज्ञानाचा अथवा संपत्तीचा कांहींच उपयोग होत नाहीं. एकादा धडधाकट कुणबी देखील आपल्या झोंपड्यात पडून मीठभाकर खाऊन जितका आनंदी असतो तितका राजविलासात निमग्न झालेला परंतु रोगी राजा देखील नसतो! जर आपली शरीरसंपत्ती चांगली आहे तर त्याला सर्वप्रकारचीं सुखें असल्याप्रमाणेंच आहेत. जर मनुष्याची शरीरसंपत्ती चांगली नाहीं तर तो जीवंत असून मेल्याप्रमाणेंच होय. कितीही श्रीमंत अथवा शहाणा मनुष्य असून जर त्याचें शरीरबल पंगू आहे तर त्याचे हातून कोणतेंही महत्कृत्य होणार नाहीं. याकरितां ज्याचें शरीरसामर्थ्य जबरदस्त आहे आणि ज्याचें शरीर नेहमीं निरोगी असतें तो मनुष्य धन्य होय.

याप्रमाणें जरी सर्व सिद्धीचें साधन शरीरसंपत्ती आहे

तरी बहुत लोक अज्ञानानें अथवा मूर्खपणानें आपल्या शरीरानें व्यर्थ नुकसान करून घेतात याला काय ह्मणावें? आमच्या शरीरसंपत्तीचा ऱ्हास होण्याचें मुख्य कारण आमची दुःखद परतंत्रता होय. इंग्रजसरकारच्या राज्यापासून जरी आह्मांस बहुत प्रकारचे नफे झाले आहेत तरी आमचे तोटेही इतके झाले आहेत कीं ते सर्व नफे त्या तोट्यांपुढें कांहीच नव्हत ह्मटलें तरी चिंता नाहीं. आणि विशेषेंकरून शरीरबळाच्या बाबतींत जें नुकसान झालें आहे व होत आहे तें कशानेंही भरून काढतां येणार नाहीं. जे हिंदुलोक पूर्वी महा लढवय्ये होते व ज्यांनीं एकवेळीं इंग्रजबहादुरासही चांगला हात दाखविला होता तेच लोक सर्वप्रकारें परतंत्र होऊन निःशस्त्र बनल्यामुळें त्यांची शक्ति नष्ट व्हावी व मूठभर इंग्रजलोकांनीं तीस कोटी प्रजेवर अम्मल चालवावा यांत आश्चर्य तें काय?

सुधारणा ही मानवी शक्तीच्या ऱ्हासास मुख्य कारण आहे. मनुष्य जेव्हां प्रथमावस्थेंत अथवा रानटी स्थितींत असतो तेव्हा त्याला कंद फळें अथवा हिरवें मांस खावें लागतें; यंत्रादिकांची माहिती नसल्यामुळें सर्व श्रमाचें काम हातानें करावें लागतें व पांघरण्यास वस्त्रप्रावर्ण देखील नसतें. यामुळें त्याच्या शरिरांतील प्रत्येक अवयवावर भरपूर काम पडून ते सशक्त होतात. परंतु जसजशी सुधारणा होत जाते तसतशी मानसिक श्रमाकडे मनुष्याची प्रवृत्ती होते व बुद्धिबळानें यंत्रादिकांची कल्पना निघाल्यामुळें व दुसऱ्या पुष्कळ गोष्टींचें ज्ञान झाल्यामुळें त्याचें खाणें वगैरे नाजूक पदार्थांचें बनतें व त्यांना फारसे शारी-

रिकें श्रम करावे लागत नाहींत. यामुळें जरी त्याची बुद्धी विकास पावते तथापि शरीरबल कमी होत जातें.

याच नियमानें जगांतील सर्व राष्ट्रांतील लोकाचें शरीरसामर्थ्य कमी होत आहे. आमच्या पुराणांतील अद्भुतशक्तींचें वर्णन सोडून दिलें तरी ग्रीक व इतर लोकांमध्येंही आपले पूर्वज आपल्यापेक्षां फार बळकट होते अशा दंतकथा त्यांच्यामध्यें आहेत यावरून जगांतील सर्व लोकांचे पूर्वज एकेकाळीं आतांच्या लोकांपेक्षां फार बळकट होते हें सिद्ध होतें व अजूनही रानटी लोकांची व पक्क्या सुधारलेल्या लोकाची तुलना केल्यास रानटी लोकाचेंच सामर्थ्य जास्त होईल.

पारतंत्र्यामुळें जरी आमचें सर्व तेज लोपून गेलें आहे व द्वापारयुगांतील भीमसेनाप्रमाणें आपल्या आंगीं सामर्थ्य येण्याची शक्यता नाहीं तरी जर आपण सर्व बालविवाहासारख्या मूर्ख समजुती घालवून देऊन व सुधारणाकाळांतील कोणत्याही चैनीस फाजील वश न होतां आपण चालू तर आपलेही आंगीं इंग्लिशलोकांप्रमाणें शक्ती येऊन या जीवनकलहांतून आह्मी पार पडूं; व असें न झाल्यास आह्मी नामशेष होणार यांत संशय नाहीं. वरील सूचनेंप्रमाणें जर प्रत्येक हिंदु मनुष्य विचारानें वागेल तर आर्य लोक खचित पुन्हां उदयास येतील.

---

## महत्वाकांक्षा.

जीर्यन्ति जीर्यतः केशा दन्ता जीर्यन्ति जीर्यतः ।
जीवनाशा धनाशा च जीर्यतो ऽपि न जीर्यति ॥

प्रत्येक मनुष्यास आपण मोठें विद्वान व्हावें, आपणांस पुष्कळ संपत्ती मिळावी, आपल्याजवळ पुष्कळ दासदासी असाव्या असें वाटत असतें व असें वाटणें हही मनुष्यस्वभावात स्वाभाविकच आहे. आपणांस एखादी दहा रुपयाची कारकुनीची जागा मिळाली म्हणजे शंभर रुपयांची मामलेदारीची जागा मिळावी अशी इच्छा उत्पन्न होते; ती परिपूर्ण झाली असता हजार रुपयाचा कारभाऱ्याचा हुद्दा मिळाल्यास ठीक पडेल असें वाटूं लागतें व तीही इच्छा सफळ झाल्यास दहाहजारांचा गव्हर्नर व्हावें अशी आशा लागते! किंबहुना काय कीं आचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें वार्धक्य येऊन मरणाची वेळ आली तरी आशा जात नाहीं. हीच महत्त्वाकांक्षा होय. आतां येथें एवढें सांगून ठेविलें पाहिजे कीं, ज्या मनुष्याच्या अंगीं कर्तृत्वशक्ति असते त्यासच अशा इच्छा उत्पन्न होतात व असाचेच हेतू पूर्ण होतात. कर्तृत्वहीन मनुष्यास महत्वाकांक्षेची ओळखही नसते.

आता अशी इच्छा करणें हें चांगलें अथवा वाईट एवढेंच आपणास पाहिलें पाहिजे. आमच्या वेदान्त मताप्रमाणें अशी इच्छा करणें हें फार दोषास्पद मानिलें आहे, जर ईश्वराची ओळख करून घ्यावयाची असेल तर आशेला मनातून खणून काढिलें पाहिजे असें सांगितलें आहे. खरोखर सार्वत्रिक हा उपदेश त्याज्य किंवा योग्य आहे यात संशय नाहीं. परंतु सर्व मनुष्यें साधू झालीं तर जग चालावें कसें व असें होणेंही संभवनीय नाहीं. यामुळें जर आपणास साधू न बनता प्रपंचामध्येंच परमार्थ साधावयाचा आहे व एकंदर जगाबरोबर सर्व गोष्टींत टक्कर मारावयाची आहे तर अशी इच्छा असणें हें फार महत्त्वाचें आहे;

किंबहुना राष्ट्रास महत्वाकांक्षा नसल्यास त्या राष्ट्राचें अस्तित्व कायम राहील किंवा नाहीं याची शंकाच आहे. मात्र त्या महत्वाकांक्षेच्या भरांत दुसऱ्यांचा व्यर्थ चुराडा होणार नाहीं, एवढी खबरदारी घेतली पाहिजे.

जर मनुष्याला महत्वाकांक्षा नसती तर तो आज ज्या सुधारणेच्या शिखरावर जाऊन नानातऱ्हेचीं सुखें भोगितो आहे त्या पदवीला तो कधींच पात्र झाला नसता. दुसऱ्या अनेक रानटी पशूंप्रमाणें तोही वनचर बनून कंदमुळें खाऊन अथवा एकमेकांना फाडून खाऊन अरण्यांत नग्न होत्साता इतस्ततः भ्रमण करीत राहिला असता. परंतु ईश्वरानें मनुष्यप्राण्यांमध्यें जी ज्ञानज्योत उत्पन्न करून ठेविली आहे ती मनुष्यास कोठून स्वस्थ बसूं देणार? यावरून महत्वाकांक्षा हा दोष नसून ईश्वर प्रेरितच एक अमूल्य गुण आहे असें म्हटलें पाहिजे.

ज्याप्रमाणें कोणत्याही गुणाचा अतिरेक होऊन त्या गुणाचा वाईट मार्गीं व्यय झाला असता तो दुर्गुण बनतो त्याचप्रमाणें महत्वाकांक्षेची गोष्ट आहे. नेपोलियननें जरी आपल्या शौर्यानें सर्व युरोपखंड काहीं वर्षें अगदीं हालवून सोडिलें होतें तरी ज्याप्रमाणें पीटरधिग्रेत ह्याची लोक स्तुती करितात तशी नेपोलियनची कोणीही करीत नाहींत. याचें कारण पहिल्यानें असंख्य माणसाचा रक्तपात करून व राष्ट्रें बुडवून आपल्या महत्वाकांक्षेचा दुरुपयोग केला व दुसऱ्यानें आपला देश सुधारण्याकडे तिचा सद्व्यय केला हें होय.

( " खरा सद्गुण म्हणजे दोन अतिशयाचा मध्य होय. " )

अरिस्टाटल

इच्छति शती सहस्रंच सहस्री लक्षमीहते ।
लक्षाधिपस्तथा राज्यं राज्यस्थः स्वर्गमीहते ॥ १ ॥

---

## स्वाभिमान.

तुका ह्मणे थोरपणें । नरक होति अभिमानें ॥

" गर्वाचें घर खालीं " या ह्मणी प्रमाणें जरी मनुष्याच्या आंगीं गर्व असल्यास तो त्याच्या नाशास कारण होतो तरी मनुष्याच्या आंगीं आपल्याबद्दल योग्य अभिमान असणें हें फार महत्वाचें आहे. गर्व आणि अभिमान यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. गर्वाच्या योगानें मनुष्याचा स्वभाव बिघडून त्याचें नुकसान होतें, यामुळें नेहमीं त्यापासून वाईट परिणाम होतो. परंतु जर त्याच्या आंगीं स्वाभिमान असला तर त्याच्या गुणाबद्दल त्याला योग्य खात्री असते यामुळें आपल्या शक्ती बाहेर तो कधींही भकत नाहीं, ह्मणून त्याचें गर्विष्ठ मनुष्याप्रमाणें जगांत हांसें न होतां त्याचा प्रत्येक कामामध्यें जय होतो, यामुळें त्यापासून नेहमीं चांगला परिणाम घडतो.

प्रत्येक मनुष्याच्या आंगीं स्वाभिमान असल्याशिवाय त्याच्या आंगीं कर्तृत्वशक्ति कधींही येणार नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याचा अभ्युदयही कधीं होणार नाहीं. यावरून प्रत्येक गुण संसारी मनुष्याचे आंगीं पूर्णपणें नसल्यास त्यापासून कोणत्याहीप्रकारें फायदा होणार नाहीं हें खरें. पूर्ण अभिमानशून्य होणें हें जरी साधू

लोकांच्या आंगीं गुणाप्रमाणें शोभतें तरी तें सामान्य जनाच्या आंगीं असणें मोठें लांछनास्पद आहे.

अभिमानशून्य मनुष्याचे हातून कोणतेंही महत्कृत्य होणार नाहीं. याला प्रत्यक्ष प्रमाण आपल्या लोकांचेंच आपल्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें आहे. ज्या आर्यांनीं आपल्या अतुलप्रतापानें व बुद्धिवैभवानें सर्व पृथ्वीवर आपली अमर कीर्ति पसरली व स्वाभिमानानें आपलें वैभव मोंगलाशीं व इतर परकीयाशीं झगडून बहुत काळपर्यंत कायम ठेविलें त्याच आर्यसिंहाचे बच्चे आह्मी आज अभिमानशून्य होऊन गेल्यामुळें परकीयाच्या अंमलाखालीं लोळत पडलों आहों व मूठभर इंग्रजलोक जे आज तीस कोटी प्रजेवर अंमल चालवीत आहेत त्याचें कारण आमची अभिमानशून्यता नव्हे तर काय?

आज मितीस इंग्रजलोक जे इतक्या रानटी स्थितीपासून सुधारणेच्या शिखरास पोहोंचले आहेत व पृथ्वीतील सर्व राष्ट्रांमध्यें सर्व गोष्टीनीं पुढें गेले आहेत त्याचें कारण त्यांच्या आंगचा स्वाभिमान होय. त्यांच्यामधलें व आह्मांमधील अंतर इतकेंच कीं, त्यांना एवढामादेखील अपमान सहन होत नाहीं व आह्मी साहेबानें बुटानें मारिलें तरी मोठा संतोषच मानितों ही केवढ्या शरमेची गोष्ट आहे बरें! याकरितां प्रत्येक मनुष्यानें स्वाभिमान धरल्यास आपल्या राष्ट्राचा अभ्युदय लवकरच होईल.

बलवानपि निस्तेजाः कस्यनाभिभवास्पदम् ॥
निःशंकन्दीयते लोकैः पश्य भस्मचये पदम् ॥ १ ॥

# मानसिक धैर्य.



कोणतीही नवीन गोष्ट जनसंमताविरुद्ध प्रचारांत आणणें व त्याप्रमाणें वर्तन ठेवणें हें काम फार कठिण आहे, किंबहुना साधारण धैर्याच्या मनुष्यास हें कधींही साध्य होणें नाहीं. असल्या प्रसंगीं मनुष्याचें मानसिक धैर्य मोठें कडक असावें लागतें. सभेमध्यें बोलतांना मोठमोठीं मिट्टीं व आवेशाचीं संभाषणें पुष्कळ मनुष्यें करतील, परंतु त्या गोष्टींच्या अंमलबजावणीची वेळ आली असतां हजारांपैकीं किती मनुष्यें मोठ्या धैर्यानें पुढें सरसावतील याची शंकाच आहे.

यामुळें " बोले तैसा चाले, त्याचीं वंदावीं पाउलें. " ह्याप्रमाणें ज्याचें आचरण असेल त्याचाच विजय होऊन मान-मान्यता वाढेल व त्याच्याविषयीं लोकांचा विश्वास बसेल. परंतु अशी गोष्ट घडणें फार दुर्घट काम आहे, सुधारक म्हटल्याबरोबर जो एकप्रकारचा तिटकारा बहुजनसमाजास येतो; त्याचें मुख्य कारण त्यांच्यांपैकीं कांहींजणांनीं नेभळेपणा दाखविला हें होय. वास्तविक पाहतां सुधारक हे चांगले सुशिक्षित असल्यामुळें त्यांना कांहीं जुन्या चालीरीतींबद्दल फार वाईट वाटतें, ह्या चाली समाजक्षयास कारण होत असल्यामुळें त्यांचीं कोंवळीं मनें स्वभावतः व सहृदयतेनें भरून जातात, व त्या आवेशांत ते आमच्या चालीरीतींचे गुणदोष उत्तमप्रकारें लोकांपुढें मांडतात आणि त्यांचा त्याग करण्याविषयीं उपदेश करितात.

परंतु घोडें पेंड खातें तें पुढेंच. " आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः " या ह्मणी प्रमाणें आमचें अवसान शेवटपर्यंत कायम रहात नाहीं. त्याचप्रमाणें आमच्या सुधारक लोकांस समाजामध्यें आपलीं मतें निर्भयपणें स्थापण्याचें अथवा मतांप्रमाणें चालण्याचें धैर्य नाहीं यामुळें आमच्या देशांत सुधारणेची प्रगति फार सावकाश चालली आहे. जर आपल्या देशाचा अभ्युदय होऊन त्याची कीर्ती दिगंतरीं पसरावी अशी इच्छा असेल तर आपल्या लोकांचे आंगीं मानसिक धैर्य पूर्णपणें आलें पाहिजे.

आपलीं मतें जर खरीं आहेत, त्यांपासून देशाचें कल्याण होणार आहे तर आपलीं मतें निर्भयपणें स्थापण्यास व त्याप्रमाणें वागण्यास काय हरकत आहे ! लोक आपल्याला नांवें ठेवतील अथवा छळतील या भयानें जर आपण आपल्या मतांचा त्याग करून त्यांच्या मतांचा स्वीकार केला तर आपण खोटें आचरण करून देवापाशीं अपराध केल्यासारखें होणार नाहीं काय ? असें केल्याशिवाय आपल्या मताचें समर्थन कधींही होणार नाहीं. ग्यालिलियाला त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं नानाप्रकारचा त्रास देऊन शेवटीं विनाकारण तुरुंगांतही टाकिलें; परंतु " पृथ्वी फिरते " हें जें त्याचें मत तें त्यानें मरेतोंपर्यंतही सोडिलें नाहीं. यामुळेंच आज त्याची इतकी वाहवा होत आहे; त्याचप्रमाणें इंग्लंदांतील क्र्यानमर नांवाच्या बिशपास मेरीच्या कारकीर्दीत जीवंत जाळलें तरी त्यानें आपलीं मतें सोडिलीं नाहींत.

शाबास ! यालाच ह्मणावें धैर्य. जेथें असलीं नररत्नें नेहमीं निपजतात त्या देशाचा उदय होण्यास अवकाश

काय? नाहींतर आम्हीं जरा कांहीं संकट येण्याचा रंग दिसला कीं कान्त्रा वर करून मोकळे! असल्या लोकांकडून देशहित तें काय होणार? सुदैवेंकरून इंग्रजलोकांचें राज्य झाल्यापासून निदान प्रत्यक्ष छळाचा तरी पूर्ण प्रतिबंध झाला आहे. याकरिता अशावेळीं साधारण संकटांस न जुमानता आमच्या लोकांनीं कंबर बांधिली तर काय होणार नाहीं?

---

## आत्मसंयमन.

मन हें सर्व इंद्रियांचा राजा आहे. हा राजा ज्याप्रमाणें हुकूम करील त्याप्रमाणें सर्व चाकर आपापले व्यापार दक्षतेनें चालवितात. मनानें आज्ञा केल्यावांचून पाय एक पाऊलही पुढें टाकीत नाहींत व डोळे इच्छित वस्तूंकडे ढुंकूनही पहात नाहींत. त्याचप्रमाणें आपल्याकडून जीं बरीं वाईट कर्में घडतात तीं सर्व मनाच्या आज्ञेवरून घड-

---

१ यापैकीं पहिला चाकर मनाला नेहमीं तूं जें काय करतोस तें विचारानें करीत जा असें सांगतो, व दुसरा चाकर सारासारविचारानें वागत जा असें सांगतो. याप्रमाणें हे दोघे इमानी सेवकद्वय आपली कामगिरी मोठ्या प्रामाणिकपणानें बजावीत असतात; परंतु कामक्रोधादि नीच शत्रु व दुसरीं सुखासक्त इंद्रियें मनराजाचे कान फुंकून व त्याला बहिरंगीं चांगला परंतु अंतरंगीं वाईट सल्ला देऊन आपल्याकडे वळवितात; यामुळें या प्रामाणिक भृत्यवर्गाच्या सदुपदेशाचा कांहीं उपयोग न होतां मन विकारवश झाल्यानें मनुष्याचा नाश होतो. यावरून आत्मसंयमन करणें हें किती कठीण आणि महत्त्वाचें आहे हें दिसून येईल.

णार. याप्रमाणें कर्ते करवितें व सुखदुःखाचें मूळ जें मन त्या मनाला आपल्या ताब्यांत ठेवणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे.

आतां कोणी असें ह्मणेल कीं मन हें सर्व इंद्रियांचा स्वामी असल्यामुळें तें जे बरे वाईट हुकूम फर्मावील त्याप्रमाणें प्रत्येक इंद्रियाला वागलें पाहिजे व त्याप्रमाणें तीं वागतातही; अशी जर स्थिती आहे तर आपल्या ताब्यांत आपलें मन ठेवणें हें अशक्य नाहीं काय? होय. हा प्रश्न सकृद्दर्शनीं खरासा भासतो. परंतु थोडासा विचार केला असतां ही समजूत चुकीची व कोतेपणाची आहे असें दिसून येईल. सर्व इंद्रियें जरी मनराजाचे चाकर असून, राजा सांगेल त्याप्रमाणें न्याय अन्याय न पाहतां वागण्यास एका पायावर तयार असतात, तरी कांहीं चाकर मनाचे हुकूमबंदे असूनही त्याचे हितकर्ते आहेत. ते इतर इंद्रियांप्रमाणें सांगेल तें बरें वाईट काम न करितां मनास वाईट काम न करण्याबद्दल उपदेश करितात व असलें कृत्य केलें असतां त्यापासून वाईट परिणाम घडतात अशी सूचना देतात.

हे इमानी चाकर कोण ह्मणाल तर "सदसद्विवेकबुद्धी व विचारशक्ती" हे होत. ह्यांचा नेहमीं मनाला चांगलें कृत्य करण्याबद्दल तगादा असतो यामुळें मन हें सदसद्विवेकबुद्धीच्या ताब्यात राहिल्यास आपलें नेहमीं कल्याण होईल. परंतु बहुतवेळां मन हें आपल्या इमानी चाकराचें ऐकत नाहीं यामुळें मनुष्याचा नाश होतो. ह्मणून मनाला ताब्यावर आणणें फार कठीण काम आहे.

आजपर्यंत विश्वामित्रासारख्या महान् तपस्व्यांनीं व दुसऱ्या पुष्कळ साधूपुरुषांनीं आत्मसंयमन करण्याकरितां बहुत श्रम घेतल व घोर तपश्चर्याही केल्या परंतु, त्यांचे प्रयत्न व्यर्थ गेले; काम क्रोधादि षड्रिपूंनीं त्यांच्या मनावर पगडा बसविलाच विश्वामित्रासारख्यांच्या हातून जी गोष्ट घडली नाहीं ती आह्मांस कशी शक्य होईल असें कोणीं ह्मणेल. परंतु हा भ्रम व्यर्थ आहे. आत्मसंयमन करण्यापासून आपला फायदा आहे इतकेंच नव्हे तर त्यापासून सर्व सुखांचा व सद्गुणांचा उगम आहे असें ह्मटलें तरी चालेल, ह्मणूनच प्रत्येक मनुष्यानें आत्मसंयमन करण्यास झटणें योग्य आहे.

मन हें जरी अव्यक्त असून एक व्यक्ती आहे, तरी त्याचे व्यापार फार निरनिराळे आहेत. काम, क्रोध, लोभ वगैरे सर्व व्यापार मनाचेच आहेत. वर सांगितलेल्या काम क्रोधादिकांपैकीं कोणाचाही व्यापार सुरू झाल्याबरोबर या दुष्ट शत्रूंचा उच्छेद करण्यास इमानी सदसद्विवेकबुद्धी पुढें होऊन सूचना करिते. अशावेळीं जर विचारशक्तीनें साह्य दिलें तर ह्या विकाराचा तेव्हांच फडशा होतो. आणि जर कां ह्यांपैकीं एखादा विकार प्रबळ झाला तर तो कोणासही आटपावयाचा नाहीं तो आपलें नुकसान करील. याकरितां मनांतील कोणताही व्यापार प्रबळ होण्यापूर्वीं जर सदसद्विवेकबुद्धीचें अनुमत घेऊन विचारबुद्धीचें पाठबळ मिळविलें तर काम क्रोधादि दुष्ट शत्रूंचा नाश होऊन आपलें मन आपल्या ताब्यांत राहील व त्यापासून आपला फायदा होईल.

## आळस.

बहुत वेळ श्रम केल्यानंतर थोडीशी विश्रांती घेणें हें आपल्या प्रकृतीस योग्य व हितकारक आहे. ह्याच्या योगानें मनाला हुषारी येऊन पुनः श्रम करण्यास ताजा दम येतो. परंतु कांहींही श्रम न करितां केवळ चैनीखातर आळसांत काळ घालविणें फार हानिकारक आहे. आळस हा एक शत्रू आहे असें ह्मणतात तें खोटें नव्हे; ज्याप्रमाणें आपला शत्रू संधी साधून आपला प्राण घेईल त्याचप्रमाणें आळस हा मनुष्यास सर्वदुर्गुणांची ओळख करून देतो, व क्रमानें त्याचा नाश करितो. याकरितां आळसाच्या वाऱ्यास देखील उभें राहूं नका.

आळसापासून आपला अमर्याद तोटा होतो. सधन मनुष्यें बहुतकरून आळशी असतात असा समज आहे; परंतु तो सर्वांशी जरी नाहीं तरी थोडाबहुत चुकीचा आहे असें मला वाटतें. निष्काळजी मनुष्य-मग तो श्रीमंत असो अथवा दरिद्री असो बहुतकरून आळशी असतो असा साधारण नियम आहे, त्याचप्रमाणें दैवावर हवाला ठेवणारा इसमही आळशी असतो. आतां निष्काळजी लोक श्रीमंतातच फार; कारण संपत्ती जवळ भरपूर असल्यामुळें त्यानां कोणत्याही गोष्टीची उणीव नसते यामुळें ते कोणताही उद्योग न करितां आळसांत आपला काळ घालवितात. व कांहीं मूर्ख दरिद्री लोक दारिद्र्यास त्रासून नशीबीं असेल तसें होईल असें ह्मणून आळसांतच निमग्न होतात.

परंतु आळशी मनुष्याचें-मग तो धनवान असो अगर

धनहीन असो—नुकसान व्हावयाचेंच. श्रीमंत आळशी असल्यास त्याच्या भांडारांत उद्योगानें भर न पडत गेल्यानें ओहोटी लागते, व अल्पकाळांत त्यास माध्यानकाळची पंचाईत येऊन पडते; जे मूळचेच दरिद्री असतात, त्यांना नेहमीं अर्धपोटींच रहावें लागतें, यामुळें लवकरच त्यांची प्रकृती बिघडते. याशिवाय आळसापासून असंख्य तोटे होतात आळशी मनुष्याची प्रकृती कधींही नीट असत नाहीं. नेहमीं अन्नाचें पचन न झाल्यामुळें त्याला अनेक व्याधी जडतात. त्याचें मन कधींही सुप्रसन्न असत नाहीं, व त्याचें मुख कधींही आनंदित दिसत नाहीं. याप्रमाणें या दुर्गुणापासून अपरिमित तोटे होतात.

आपलें आजपर्यंत जें नुकसान झालें आहे व होत आहे तें केवळ ह्या दुर्गुणामुळेंच होय. आळशीपणा आंगीं भरण्यास जीं मुख्य कारणें आहेत, त्यांतून निष्काळजीपणा व देवभोळेपणा हीं दोन मुख्य होत; देवभोळेपणा हा आपल्या लोकाचे आंगीं पूर्णपणें भरला आहे. आपले लोक आळशी ह्मणजे केवळ निजून असतात. असें मुदलींच नाहीं. त्याचे आंगीं धाडशीपणा बिलकूल नाहीं. प्रत्येकाला पोटापुरतें मिळवून केव्हां एकदां निष्काळजी होईन असें वाटत असतें. यामुळें सर्व गोष्टींनीं दीन झालेले आमचे लोक रंजीस येऊन काय दहापांच रुपये मिळनील तेवढ्यांतच आनंद मानून स्वस्थ असतात.

काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम् ॥
व्यसनेनतु मूर्खाणां निद्रया कलहेन वा ॥ १ ॥

**अलसस्य कुतो विद्या अविद्यस्य कुतो धनम् ॥**
**अधनस्य कुतोमित्रममित्रस्य कुतः सुखम् ॥ २ ॥**

---

## ममता.

ईश्वरानें ह्या सृष्टीमध्यें जीवकोटीच्या रक्षणार्थ जे नानाविध चमत्कार करून ठेविले आहेत. त्या चमत्कारांचें महत्व लक्षांत आलें असतां त्याच्या अगाध कर्तृत्वाबद्दल व योजनेबद्दल विलक्षण आश्चर्य वाटतें. या सर्व प्राण्यांवर ईश्वराची समदृष्टि आहे हें पाहून आपल्या अंतःकरणांत पूज्यबुद्धि उत्पन्न होते. जीवकोटींतील अतिशय उच्च अशा मनुष्यप्राण्यापासून तों तहत क्षुद्र कीटकापर्यंत प्रत्येक प्राण्यामध्यें आपल्या संततीविषयीं फारच कळकळ दिसून येते, व हिलाच आपण ममता असें ह्मणतों.

जर प्राण्याच्या आंगीं ममता नसती तर त्यांच्या संततीचें कधींही रक्षण झालें नसतें. समुद्रामध्यें कांहीं जातीचे मासे आहेत त्यांना आपल्या पोरांबद्दल बिलकूल काळजी नसते,यामुळे त्यांची पोरें दुसऱ्या जळचर प्राण्यांकडून भक्षिलीं जातात, अथवा अन्यतऱ्हेनें नाश पावतात. सर्व जातीच्या पशुपक्ष्यांमध्यें व मनुष्यांमध्यें माया आहे ह्मणूनच त्यांच्या संततीचें उत्तमप्रकारें पोषण होतें. प्राण्याच्याठायीं गर्भधारण झाल्यापासून तों तहत पिलें मोठीं होत तोंपर्यंत आईबापास–विशेषेंकरून आईस किती-प्रकारचे कष्ट सोसावे लागतात ह्याची कल्पना केली असतां असे हाल सोसण्यास अन्यप्रसंगीं मनुष्य सहसा

यार होणार नाहीं. परंतु संततीच्या केवळ अकृत्रिम प्रेमामुळेंच प्राणी असलेही हाल सोसण्यास तयार होतो.

अहाहा! मातृप्रेमाची थोरवी कोण वर्णन करील? इतर मनुष्यें आपल्या नफ्याकरितां दुसऱ्यांवर प्रीती करितात. गरीब मनुष्यें श्रीमंतांवर कांहींतरी मिळेल ह्मणून प्रीती करीत असतात, इतर मनुष्यें दुसऱ्या कारणामुळें करितात, परंतु माता जी आपल्या बालकावर ममता करिते ती केवळ अप्रतीम असते. मुलें कितीही कुरूप असोत, अथवा कितीही दुर्गुणी निघोत त्यांच्यावर त्यांच्या आईचें विलक्षण प्रेम आढळून येतें. याचें कारण ईश्वराची अप्रतिम योजना असें कोण ह्मणणार नाहीं? जर आईनें आपल्या मुलांस झिडकारिलें तर त्यांची काय अवस्था होईल हें दिसतच आहे.

पशुपक्ष्यादि नीचकोटीमध्यें मातृप्रेमाची सीमा त्यांचीं पोरें मोठीं होत तोंपर्यंतच असते. त्यांच्या आंगांत स्वसंरक्षण करण्याचें त्राण आलें कीं, तीं आपल्या वृद्ध मातापितरांस सोडून जातात. परंतु मनुष्य हा ज्ञानबलेंकरून श्रेष्ठ असल्यानें त्याच्या हातून असें कर्म घडणें हें अनुचित होय. याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपल्या भावंडांवर प्रेम ठेवून ज्याप्रमाणें आपल्या मातापितरांनीं आपल्याला परस्वाधीन स्थितींत सुख दिलें त्याचप्रमाणें त्यांनाही परस्वाधीन स्थितींत ह्मणजे वृद्धापकाळीं सुख देणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म होय.

ममतेपासून बहुत फायदे होतात. "प्रीतीपासून प्रीती उत्पन्न होते." ज्याप्रमाणें आपण आपल्या इष्टमित्रांवर ममता करितों त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्यावर ममता

केल्यास सर्व लोकांचें कल्याण होईल, त्यापासून लोकांमध्यें एकी उत्पन्न होऊन राष्ट्राचें सामर्थ्य वाढेल. याकरितां परस्परावर माया करणें हें फार अगत्याचें आहे.

---

## शिक्षण.

मनुष्यामध्यें व इतर प्राण्यामध्यें जें महदंतर आहे व ज्याच्यायोगानें मनुष्य एवढ्या योग्यतेस चढला आहे त्याचें कारण त्याची अपूर्व बुद्धिमत्ता ही होय. ही अमोलिक देणगी मनुष्यास ईश्वरानें दिल्यामुळें त्यानें आज सर्व प्राण्यांवर आपली छाप बसविली आहे. इतर प्राण्यांमध्यें एकप्रकारची उपजत बुद्धी दिसून येते. परंतु नियमित मर्यादेपलीकडे त्यांच्या बुद्धीची वाढ होत नाहीं जरी काहीं जनावरांस भीती दाखवून अथवा संवयीनें मनुष्यप्राण्याप्रमाणें कृती करण्यास शिकवितां येतें तरी त्याचें करणें बुद्धीपुरःसर नसून केवळ संवयीनें अथवा भीतीनें प्राप्त झालेलें असतें. शिकविल्यापेक्षां स्वबुद्धीनें त्यानां काहींही करितां येत नाहीं. परंतु मनुष्याची गोष्ट तशी नाहीं. शिक्षणानें मनुष्याचें मन प्रगल्भ होऊन त्याची बुद्धी वाढत जाते.

प्रत्येक मनुष्याचें त्याच्या देशासंबंधी मुख्य कर्तव्य ह्मटलें ह्मणजे आपल्या मुलांना उत्तमप्रकारचें शिक्षण देऊन त्याना सुलक्षणी करणें हें होय. कारण मुलें हींच पुढील पिढीचे बाप होणार. याकरितां त्यांचें मन शिक्षणानें सर्व प्रकारें सुधारल्यास ते आपल्या मुलांना सुलक्षणी करतील व ही परंपरा कायम राहून देशाचें कल्याण

होईल. याकरितां शिक्षण हें सर्वप्रकारें करून मनुष्याच्या उन्नतींचें साधन आहे.

शिक्षण देण्यास योग्य काळ बाळपण हें होय. लहानपणीं मनुष्याच्या मनांत जशा लवकर गोष्टी भरतात तसें थोरपणीं होत नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्याचा स्वभाव संवयीमुळें लहानपणींच बनत चाललेला असतो याकरितां अशावेळीं जर त्यांना उत्तम प्रकारचें नीतिशिक्षण वगैरे दिलें तर त्यांचा स्वभाव उत्तम बनून त्यांचें व सर्व देशाचें कल्याण होईल.

आपल्या लोकांमध्यें आपल्या मुलांना शिक्षण देणें ह्मणजे त्यांना कोठें तरी नोकरी करून पोट भरण्यास लायख करविणें असें दिसतें. ही किती भ्रांतिमूलक व मूर्खपणाची कल्पना आहे बरें! याकारणामुळें आमचे लोक आपलीं मुलें चारपांच वर्षांचीं झालीं नाहींत तोंच त्यांस शाळेंत पिटाळून लावितात व त्यांच्या शरीरप्रकृतीकडे बिलकूल लक्ष न देतां घाईघाईनें त्यांना कोठें तरी नोकरींत गुंतवून टाकितात. कोण ही शिक्षणाची अवहेलना, अशामुळें देशाचें कल्याण कधीं तरी होईल काय? शिक्षण ह्मणजे केवळ पोटापुरती विद्या नसून त्याच्या योगानें मनुष्याला ह्या जगांमध्यें सर्व प्रकारचा अनुभव आला पाहिजे, त्याचें मन प्रगल्भ झालें पाहिजे. तरच कल्याण होईल.

आपल्यामध्यें मुलाला लहानपणापासून शाळेंत घातल्यामुळें फार नुकसान होत आहे. आपल्या देशामध्यें शिकणारे लोक ह्मणजे विशेष करून ब्राह्मण हे होत. सर्व ब्राह्मण हे सरकारी अथवा दुसऱ्या कोठेंही चाकरीस राहतात यामुळें ते दिवसा क्वचितच घरांत असतात. ह्मणून

आपलीं मुलें कोठें तरी भटकत फिरत राहतील यासाठीं त्यांना शाळेंत हाकलून देतात. ज्या वयामध्यें त्यांच्या स्वभावाला स्वातंत्र्याचें वळण लागत असतें अशावेळीं जर त्यांना शाळेमध्यें कोंडून ठेविलें तर त्यापासून केवढें नुकसान होतें याचा कोणी विचार केला आहे काय? आमच्यामध्यें गृहशिक्षणाची फार उणीव आहे यामुळें आमचीं मुलें जशीं उद्योगी वगैरे व्हावीं तशीं होत नाहींत. आमच्यांतील पुरुषांना बहुतेक फावत नाहीं यामुळें बायका जर चांगल्या सुशिक्षित होतील तर मुलगा आठ वर्षांचा होईपर्यंत त्यास सर्वप्रकारचें गृहशिक्षण देण्यास त्या हयगय करणार नाहींत व त्यापासून मुलांचें हित होईल.

मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते ।
कान्तेवचापि रमयत्यपनीयखेदं ॥
लक्ष्मीं तनोति वितनोतिच दिक्षकीर्तिं ।
किं किं न साधयति कल्पलतेवविद्या ॥ १ ॥

## स्वदेशाभिमान.

ज्याप्रमाणें प्रत्येक मनुष्यास स्वाभिमान व स्वजातीचा योग्य अभिमान असणें अवश्य आहे तितकेंच, किंबहुना त्याहूनही जास्त स्वदेशाभिमान असणें हें फार महत्वाचें आहे. सामाजिक अथवा धार्मिक बाबतींत देशांतील मनुष्यांचे परस्परांशीं कितीही मत भेद असोत व त्यांचे आचारविचार कितीही भिन्न असले तरी चालतील; परंतु सर्व राष्ट्राच्या हितानहिताचा ज्यांत संबंध असतो अशा राज-

कीय बाबतींत प्रत्येक मनुष्यानें आपला दुराग्रही मताभिमान अथवा जात्यभिमान सर्व गुंडाळून ठेवून केवळ बंधुत्वाच्या नात्यानें सर्व मनुष्यांशीं सारखें वागलें पाहिजे, प्रसंगीं आपल्या राष्ट्राच्या बचावाकरितां मोठ्या आनंदानें आपले प्राणही धारातीर्थीं अर्पण केले पाहिजेत तरच त्याचें नांव **स्वदेशाभिमान** होय.

ज्या देशांतील लोकांमध्यें स्वदेशाभिमान नाहीं तो देश कधींही उर्जित दशेस येणार नाहीं. याची साक्ष आपला हतभागी देशच देत आहे. प्रथमपासून आपल्या लोकांचें लक्ष परमार्थाकडे फार आहे, व तो ओढा अद्यापही कमी झाला नाहीं. हा आपल्या लोकांत एक दुर्गुण आहे असें जरी मी ह्मणत नाहीं तरी त्यापासून आमचा एकप्रकारें फारच तोटा झाला आहे. या परमार्थामुळें आमच्यामध्यें एकप्रकारचा फाजील सोशीकपणा व अभिमानशून्यता उत्पन्न झाली आहे व या दोन दुर्गुणामुळेंच आह्मी पारतंत्र्य भोगीत आहों. जोंपर्यंत यवनांच्या असह्य जाचानें त्रस्त झालेले मराठे, ब्राह्मण वगैरे सर्व हिंदू केवळ बंधुत्वाच्या नात्यानें वागून खांद्याशीं खांदा लावून लढत होते व आपल्या देशबांधवाचें जें कल्याण तेंच आपलें कल्याण असें परस्पर समजत होते तोंपर्यंत त्याच्याशीं टक्कर देवून मुसलमान कधींही विजय पावले नाहींत व आपल्या लोकांसही स्वराज्याखालीं कांहीं दिवस आनंदानें घालवितां आले.

इंग्रज लोकाचें, दारू पिण्यांत, बूट पाटलोन घालण्यांत अथवा मांस वगैरे खाण्यांत अनुकरण न करितां त्यांच्या स्वदेशाभिमान, दीर्घोद्योग वगैरे गुणाकडे लक्ष देवून त्या

गुणांचें अनुकरण केल्यास आपल्या लोकांचा किती फायदा होइल बरें? इंग्रजलोकांचे आंगीं प्रथमपासूनच स्वदेशाभिमान पूर्ण भरलेला आहे; ह्मणूनच त्यांनीं महान् संकटांसही दाद न देतां आजपर्यंत आपलें स्वातंत्र्य अव्याहतरीतीनें कायम ठेविलें आहे. इतकेंच नव्हे तर आज सर्वजगामध्यें ते मोठ्या योग्यतेस चढले आहेत. त्यांच्या स्वदेशाभिमानाचें वारें इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत उत्तमरीतीनें व्यक्त झालें व तेव्हांपासूनच त्यांची विशेष भरभराट झाली. धर्मसंबंधी कांहीं कुरापती काढून इंग्रज व स्पॅनिश लोकांत वैमनस्य उत्पन्न होऊन लढाईची तयारी जारीनें सुरूं झाली. अखेरील स्पेनचा राजा फिलिप यानें मोठ्या भयंकर आरमारानिशीं इंग्लिश लोकांवर चाल केली. यावेळीं इंग्लिश लोकांतील प्रॉटेस्टंट व रोमन क्याथोलिक नांवाच्या दोन पंथांत श्रेष्ठपणाबद्दल मोठा तंटा उपस्थित झाला होता, कित्येक प्रातेस्तंतांना जीवंत जाळण्यापर्यंत या तंट्याची मजल येवून ठेपली होती. यावेळीं जर दोन पक्षांपैकीं सूड घेण्याच्या बुद्धीनें एकापक्षानें स्पॅनिश लोकांचा पक्ष उचलला असता तर इंग्लंदचें नांवहीं आज ऐकूं आलें नसतें. परंतु त्यांनीं शहाणपणानें कांहीं वेळ आपले सर्व तंटे बाजूला ठेवून मोठ्या शौर्यानें आपल्या शत्रूंचा पराभव केला व आपलें स्वातंत्र्य राखिलें!

असा स्वदेशाभिमान आपले आंगीं असता तर आज या निकृष्ट स्थितीस आह्मी पोंचलोंच नसतों. असो. झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. आतां तरी आपल्या लोकांनीं राज्यकर्त्यांचें उदाहरण पुढें ठेवून आपलें वर्तन सुधारलें तर त्यांचें सर्वप्रकारेंकरून कल्याण होईल.

## स्वार्थत्याग.

प्रत्येक मनुष्याचें वर्तन नेहमीं स्वार्थपर असतें हें त्याच्या कृतीवरून पूर्णपणें लक्षांत येणार आहे. मनुष्य आपणास कितीही संभावीत ह्मणवून घेवो अथवा आपल्या मित्रांबद्दल, वडील माणसांबद्दल अगर आपल्या धन्याबद्दल कितीही कळकळ दाखवो, ती कळकळ व तें प्रेम केवळ स्वहिताकारितां तो करीत असतो. मनुष्याला समजूं लागल्यापासून त्याच्या स्वार्थपर वर्तनास आरंभ होतो. यावरून स्वार्थत्याग करणें हें किती कठीण काम आहे हें समजून येईल.

कांहीं मनुष्यें आपलें नुकसान सोसूनही दुसऱ्यांचें कल्याण करूं इच्छितात. अशीं मनुष्यें या जगामध्यें वंद्य होत. आपला फायदा होत असून त्यांतच जर दुसऱ्या एकाद्या गरीब मनुष्याचें कल्याण होत असलें तरीही कित्येकांस तें खपत नाहीं; व कित्येक तर आपला कोणत्याही प्रकारचा फायदा नसतां दुसऱ्याचें नुकसान करूं इच्छिणारे व त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृतीही करणारे नरराक्षस या पृथ्वीवर आहेत! मग जीं मनुष्यें प्रसंगीं आपलें सर्व प्रकारें नुकसान सोसूनही केवळ दुसऱ्यांच्या कल्याणाचाच विचार करीत असतात त्या मनुष्यांची थोरवी काय वर्णन करावी!

स्वार्थत्यागापासून मनुष्याला जरी बहुतप्रसंगीं क्लेश भोगावे लागतात तरी एकंदरींत त्याच्या मनाला फार आनंद होत असतो, त्याच्या सद्गुणाची ख्याती चोहोंकडे पसरून लोकांमध्यें त्याला पूज्य मानूं लागतात; अशी

एकंदर्शानें त्याची वाहवा होते. समजा, एखादा मनुष्य पाण्यांत पडून बुडत आहे अथवा एकाद्या निरपराध मनुष्याला फांशीं देत आहेत, किंवा एखादा परोपकारी मनुष्य आपल्या जीवाकडेही न पाहतां त्या बुडणाऱ्या मनुष्याला मदत करून वर काढील अथवा फांशीं जाणाऱ्याच्या ऐवजीं आपण जाईल तर लोक त्या मनुष्याची किती स्तुती करतील बरें? ज्या मनुष्याला योग्यवेळीं मदत दिली नसतां मरण आलें असतें तो मनुष्य त्याला किती दुवा देईल बरें?

आजपर्यंत आपल्या देशांत व अन्य ठिकाणी तुकाराम, साक्रेतीसासारखे महान् महान् स्वार्थत्यागी पुरुष निर्माण होऊन गेले, त्यांनीं केवळ परहितांत आपला जन्म घालविला व त्यांतच त्यांचा अंत झाला. त्यामुळें त्याच्या देशाला ऊर्जितावस्था आली. तुकारामानें आपल्या स्वतः-विषयींची मुदलींच काळजी घेतली नाहीं, परंतु दुसऱ्याचें कल्याण करण्याकरितां तो नेहमीं झटत असे. त्याचप्रमाणें साक्रेतीसाचीही हकीगत आहे. मोठ्या सरकारी हुद्याची नोकरी आली असताही त्यानें नोकरीवर लाथ मारून अथेन्स शहरांतील मुलांना सुधारण्याविषयीं प्रयत्न केला. प्रत्यक्ष मृत्यूचें भय असतांही त्यानें आपला उद्योग सोडला नाहीं ह्मणूनच आज त्याची एवढी प्रशंसा होत आहे

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान्परित्यज्य ये ।
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्था विरोधेन ये ॥
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नति ये ।
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ १ ॥

## दानधर्म.

ज्याप्रमाणें मनुष्याचें आयुष्य पाण्यांतील बुडबुड्या प्रमाणें क्षणभंगुर आहे, त्याचप्रमाणें संपत्ती ही अशाश्वत व फार चंचल आहे. लक्ष्मीचा कोणीही भरंवसा धरतां कामा नये. जो मनुष्य एकदां कोट्याधीश असतो व ज्याचेजवळ हजारों नोकर चाकर असतात, तो मनुष्य क्षणार्धांत भिकेस लागून त्याच्या आयुष्याचें मातेरें होऊन जातें. एकादे वेळीं अति दरिद्री मनुष्यही निमिषार्धांत श्रीमंत होऊन बसतो. याप्रमाणें संपत्ती ही मनुष्यास क्षणांत रंकाचा राव व रावाचा रंक करिते; यास्तव तिचा भरंवसा कोणी धरावा?

यासाठीं जोंपर्यंत आपल्याजवळ संपत्ति आहे तों वर तिचा सद्व्यय करणें हें पत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. पशुपक्षीही आपल्या जातींतल्या प्राण्यास योग्य मदत करितात. मग विचारी मनुष्यप्राण्यानें आपल्या बांधवांस शक्त्यनुसार मदत केली तर यांत आश्चर्य नाहीं. त्यानें आपलें कर्तव्य न केलें तर मात्र तें महदाश्चर्य होय. दारिद्र्यानें अतिशय त्रस्त होऊन भुकेनें ज्याचे प्राण व्याकुळ झाले आहेत व चिरगुटाच्या कमताईमुळें ज्याचें अंग थंडीनें अगदीं बधिर होऊन गेलें आहे असा जर एखादा मनुष्य तुमच्यापुढें उभा राहून दीनवाणीनें अन्नवस्त्रासाठीं प्रार्थना करूं लागला तर त्याला अन्नवस्त्र द्यावें अशी इच्छा तुम्हांस होणार नाहीं? ज्याचें चित्त असल्या हृदयभेदक देखाव्यानेंहीं द्रवणार नाहीं तो मनुष्यकोटीहून अन्य कोटींतला असला पाहिजे.

सुखदुःखें हीं मनुष्याच्या पाठीमागें लागलींच आहेत, त्याचप्रमाणें संपत्ती व विपत्तीचें रहाटगाडगेंही नेहमीं चालूंच असणार. याकरितां मनुष्यानें द्रव्यानें अंध न होतां यथाशक्ति आपल्यापेक्षां दरिद्री मनुष्यांस मदत करावी हें फार अगत्याचें आहे.

आपल्या धर्मामध्यें दानधर्म केल्यापासून फार पुण्य लागतें व त्या पुण्यापासून परलोकीं मनुष्यास उत्तम गती मिळते असें सांगितलें आहे, यामुळें इतर लोकांपेक्षां आपल्या लोकांमध्यें दानधर्माची प्रवृत्ती विशेष दिसून येते. या समजुतीमुळें आपलें दान सत्पात्रीं होत नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्यास व दुसऱ्यांस त्यापासून तादृश फायदा होत नाहीं. याकरितां आपणांस दानधर्म करावयाचा असल्यास तो अशा लोकांस करावा कीं ज्यापासून आंधळे, पांगळे वगैरे पंगू लोकांचें व इतर अनाश्रित लोकांचें कल्याण व्हावें.

आपल्या लोकांमध्यें दरिद्र्यांस भिक्षा घालण्याचा सांप्रदाय आहे व तो अलीकडे हिंदुस्थानच्या अन्नान्नदशेमुळें फारच वाढला आहे. यामुळें लोकांमध्यें आळशीपणा फार पसरला आहे. जो तो मनुष्य धट्टाकट्टा असूनही भिक्षा मागत फिरतो व इतर धंद्यापेक्षां ह्यामध्यें विशेष फायदा होत असल्यामुळे तो याच धंद्यांत शिरतो, यामुळें खऱ्या अनाथ लोकाचा उपासमार होतो व देशामध्यें दारिद्र्य पसरत जाऊन दंगेधोपे होतात. याकरितां धर्म करतेवेळीं फार सारासारविचार करून करावा.

उपार्जितानां वित्तानां त्याग एव हि रक्षणम् ।
तडागोदरसंस्थानां परिवाह इवाम्भसाम् ॥ १ ॥

## बंधूप्रीति.



" प्रीतीपासून प्रीती उत्पन्न होते " अशी आपल्यांत एक म्हण आहे, ती किती यथार्थ आहे बरें? आपण दुसऱ्यांवर प्रीति केल्याशिवाय दुसरे आपणाला कधींही चाहणार नाहींत; याकरितां दुसऱ्यांनीं आपणांस जसें वागवावें असें वाटतें तसेंच आपण दुसऱ्यांशीं वागणें हें योग्य नव्हे काय? यासाठीं प्रत्येक मनुष्यानें दुसऱ्यांवर प्रीती करणें हें परस्परास हितावह आहे.

असें असतांहीं अनादिकाळापासून दुसऱ्यांवर प्रीती करणें राहिलेंच परंतु प्रत्यक्ष आपल्या भावाबरोबरही वैर असावें हें आश्चर्य नव्हे काय? एकवेळ दुसऱ्याला पाहिजे तें देतील परंतु भावाला जर कां एक हातभर जमीन अथवा शें दोनशें रुपये आपल्यापेक्षां जास्त मिळाले तर तो आकाशपाताळ एककरून सोडील व आपण भिकेस मिळालों तरी बेहत्तर परंतु आपल्या भावाला एक तसूभरही जास्त जागा देणार नाहीं, अशी प्रतिज्ञाकरून कोर्टाची पायरी झिजवील. अलीकडे असले बंधू फारच चमकूं लागले आहेत ही दुर्दैवाची गोष्ट होय. कौरवांनी बंधुद्वेष करून आपलें सर्व राज्य गमाऊन घेतलें व शेवटी प्राणासही मुकले, औरंगजेबानें आपल्या बंधूंस ठार मारून राज्य मिळविलें, व दुसरींही पुष्कळ उदाहरणें इतिहासांत सांपडणार आहेत!

यावरून असें ठरतें कीं बंधुद्वेष सर्वकालीं प्रचलित होता. त्याचेंच शेंपूट आजमितीस कायम राहिलें आहे.

बंधुद्वेषाचें कारण असें वाटतें कीं, पूर्वी सांग्रामिककालीं प्रत्येक कुटुंबाचें आधिपत्य बापास अथवा त्याच्या पश्चात् वडील मुलास किंवा विशेषेंकरून कर्तृत्ववान मुलास मिळत असलें पाहिजे. तेणेंकरून प्रत्येक मुलास कुटुंबाचा आधिपती होण्याची इच्छा उत्पन्न झाल्यामुळें त्यांच्यामध्यें अर्थातच द्वेष उत्पन्न होऊन आजमितीस दृष्टीस पडणाऱ्या बंधुकलहाचें बीज पेरलें असावें. अलीकडे इंग्रजांचें राज्य होण्याचे पूर्वी एकादा राजा मृत्यु पावल्याबरोबर त्यांच्या मुलांमध्यें जे तंटे होत त्यांचा तरी उद्देश हाच व आतांच्या काळांतील बंधुद्वेषाचें कारणही हेंच होय.

प्रत्येक मनुष्याचे आंगीं जी स्वार्थपर दृष्टी असते तीच ह्या सर्व द्वेषाचें कारण होय असें यावरून सिद्ध होतें. वास्तवीक पाहिलें असतां निदान आतांच्या काळीं तरी आपल्या भावांबरोबर द्वेष करणें ही शरमेची गोष्ट होय. सर्व भाऊ जर एकमेकावर प्रीती करूं लागले तर तंट्याचें बीजच उरणार नाहीं एवढेंच नव्हे तर त्याचें त्यापासून फार कल्याण होईल. लक्ष्मणाची व भरताची रामावर किती प्रीति होती हें हिंदू ह्मणविणाऱ्यांस सांगितलें पाहिजे असें नाहीं व त्याप्रमाणेंच त्यांचा शेवटही गोड झाला.

त्याचप्रमाणें चवथ्या पुस्तकांतील बंधुप्रीतिबद्दलची गोष्ट वाचून कोणाचें चित्त आनंदानें उचंबळणार नाहीं. अहाहा! असे बंधू जर सर्वत्र निपजतील तर आईबापांस केवढा संतोष होईल बरें! अलीकडे आपल्या लोकांत विभक्त होण्याची चाल पडत गेली आहे. ही एकपक्षीं चांगलीच होय. कारण सांग्रामिक काळीं एकत्र राहण्याची जितती अवश्यकता होती तितकी ह्या आताच्या औद्यो-

गिक कालांत मुळींच उरलीं नाहीं; व त्याप्रमाणें चालू असलेल्या जीवनकलहामुळें विभक्त होणें हें अधीक श्रेयस्कर झालें आहे. याकरितां प्रत्येक बंधू विभक्त झाला असतां कोणताही तंटा उरणार नाहीं व सर्व उद्योगी होऊन त्यांचें कल्याण होईल; मात्र, विभक्त झाल्यावरही बंधुप्रेम निःसीम कायम ठेऊन प्रसंग पडल्यास एकमेकांनीं एकमेकांस शक्त्यनुसार मदत करीत जावें.

उत्सवे व्यसने युद्धे दुर्भिक्षे राष्ट्र विप्लवे ॥
राजद्वारे स्मशानेच यस्तिष्ठति स बांधवः ॥ १ ॥

---

## वक्तृत्व.

---

ज्या अमोलिक गुणांनीं एखादा दरिद्री मनुष्यही उत्कर्षास चढतो, त्यांपैकींच वक्तृत्व हा एक गुण होय. एकाद्या खेडेगांवांत चांगलासा अथवा साधारण गोष्टी सांगणारा असला तर लहान मुलें व केव्हा केव्हां प्रौढ पुरूषही त्याला वेढून गोष्टी ऐकण्याबद्दल आपली आतुरता दाखवितात; व त्या गांवांतील सर्व मंडळींची त्याजवर विलक्षणप्रकारची भक्ती व प्रीती असते. जर एकाद्या क्षुल्लक गोष्टी सांगणाऱ्यावर लोकांची इतकी भक्ति बसते तर दगडासही पाझर फुटतील अशी ज्याचे अंगीं वक्तृत्वशक्ति आहे त्या पुरुषास ते प्रत्यक्ष देव मानितील यांत काय आश्चर्य आहे ? वक्तृत्वाचा प्रभावच असा आहे कीं, प्रत्यक्ष शत्रूनाही मित्र बनेल.

वक्तृत्वापासून काय होणार नाहीं ? कीर्ति ......

धनवान् होईल, अप्रसिद्ध मनुष्य प्रसिद्धीस येईल, भित्रा मनुष्यही धीट होईल व केवळ वक्तृत्वाच्या प्रभावानें आपला दुस्मानही दुर्दशा पावून आपणांस शरण येईल. असे या गुणापासून अनंत फायदे होतात.

या गुणापासून सर्वांत जो मोठा फायदा होतो तो लोकप्रीती होय. थोड्या दिवसापूर्वी प्रो. साठे हे लोकांच्या कल्याणार्थ दुष्काळकायदा समजावून देण्याकरितां रत्नागिरी जिल्ह्यात गेले होते हें सर्वांस माहीत आहेच. साठे यानीं आपल्या अप्रतिम भाषणशक्तीनें दुष्काळच्या कायद्याचें स्वरूप उत्तमप्रकारानें लोकांच्या मनांत भरवून दिलें. त्यायोगानें त्यांच्याविषयीं लोकांचे मनांत इतकी कळकळ व पूज्यबुद्धी उत्पन्न झाली कीं, जेव्हा त्याच्यावर सरकारातून विनाकारण आग पाखडण्यांत आली तेव्हा त्यांच्या अपूर्व भाषणशैलीनें थक्क होऊन कृतज्ञताबुद्धीनें त्यांच्या दुःखाबरोबर आपणही दुःखी झालेले सुमारें दहा हजार लोक ते न्यायाच्या तडाक्यातून केव्हा सुटतील ह्मणून न्याय कचेरीनजीक चिंताक्रांत होऊन बसले होते. एवढी त्या लोकांची साठे यांजवर प्रीति जडण्याचें मुख्य कारण त्यांची अप्रतिम वक्तृत्वशक्ति नव्हे असें कोण ह्मणेल ?

वक्तृत्वापासून मनुष्य किती लवकर योग्यतेस चढतो याचें उत्कृष्ट उदाहरण पिट याचें होय. पिटचा बाप जरी पार्लमेंट सभेंत मोठा प्रमुख होता, व त्याच्या अलौकिक वक्तृत्वशक्तीनें सर्व सभासद अगदीं चकित होऊन गेले होते तरी पिटनें आपल्या अल्पवयांत जी कीर्ती व जो सन्मान मिळविला तो केवळ अवर्णनीय होय.

बापापासून उत्तमप्रकारचें शिक्षण मिळाल्यानें तो वक्तृत्वांत इतका निपुण झाला कीं, बापाचे मरणानंतर जेव्हां त्यानें प्रथमच पार्लमेंतसभेंत भाषण केलें तेव्हां त्याचें अगाध वाक्चातुर्य पाहून, फॉक्स व नॉर्थसारखे सभाभटही केवळ निर्वीर्य होऊन तटस्थ राहिले, व ह्या गुणामुळेंच पिटयास एकविसावे वर्षींच इंग्लंदचें प्रधानपद मिळालें, ह्या अद्भुत गुणानेंच सर्वांची प्रीति त्याजवर दृढ बसून त्यानें उत्तमरीतीनें आपलें वर्चस्व बहुतकालपर्यंत कायम ठेविलें.

केयूरा न विभूषयन्ति पुरुषं हारा न चंद्रोज्वलाः ।
न स्नानं न विलेपनं न कुसुमं नालंकृता मूर्धजाः ॥
वाण्येकासमलंकरोति पुरुषं या संस्कृता धार्यते ।
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ।१।

---

## एकी.

अल्पानामपि वस्तूनां संहतिः कार्य साधिका ।
तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यंते मत्तदन्तिनः ॥ १ ॥

पूर्वयुगाचेठायीं मनुष्याचे आंगीं विलक्षणप्रकारची शक्ती होती असें दंतकथांवरून आढळून येतें, व त्यावेळीं प्रत्येक व्यक्ति आपणापेक्षां महान् योद्धांस त्यांच्या सैन्यासहित चित करण्यास समर्थ होती. भीमसेनानें हजारों शत्रूंस निमिषमात्रांत लोळविलें व लव्हांकुश सर्व रामसेनेस व प्रत्यक्ष रामासही भारी झाले अशा अनेक कथा आपल्या पुराणांतरीं आहेत. आता ह्या गोष्टी खरोखरच घडल्या किंवा नाहीं हें सांगणें जरी विद्वान लोकांसही कठीण

आहे तरी एकंदर उपलब्ध इतिहासाच्या माहितीवरून पूर्वीचे लोक आतांच्या लोकांपेक्षां शरीरसंपत्तीनें फार सुदृढ होते हें अगदीं निर्विवाद आहे.

" संघशक्तिः कलियुगे " असें एक वचन आहे. यावरून या कलियुगाचेठायीं भक्तीपासून जितका फायदा होईल त्यापेक्षां एकीपासून केंव्हांहीं व विशेषेंकरून सध्यांचे काळीं बहुत फायदा आहे हें सांगावयास नकोच. दुसऱ्या पुस्तकांतील " म्हातारा व त्याचे मुलगे " ह्या गोष्टीवरून एकीचें महत्व पूर्णपणें लक्ष्यांत येणार आहे. मनुष्य प्राण्यानें जे समाज बनविले ते केवळ एकीचें महत्व त्याच्या ध्यानात आलें हेंच होय. जोंपर्यंत मनुष्यप्राणी एकलकोंडा रहात होता तोंपर्यंत त्याला हिंस्रपशूंपासून फार भय होतें. परंतु समाजरचना झाल्यापासून म्हणजे त्यांच्यात एकी झाल्यापासून मनुष्याचें अपरिमित कल्याण झालेलें आहे हें उघड आहे.

एकी केल्यापासून फार फायदा होतो हें तत्व पशुपक्ष्यादि नीचकोटीच्याही लक्ष्यांत आलें आहे, म्हणूनच हत्ती, रानडुकरें, रानू व एकप्रकारच्या चिमण्या यांचे कळप दृष्टीस पडतात. परंतु सर्वांत विलक्षण गोष्ट ही कीं, मुंग्यामध्यें देखील विलक्षण प्रकारची एकी दिसून येते. असें असूनही सर्वांत श्रेष्ठ अशा मनुष्यप्राण्याच्या समाजात जशी असावी तशी एकी दिसून येत नाहीं. याचें कारण त्याचें अज्ञान व त्या अज्ञानापासून पुष्ट झालेली त्याची अतिशय स्वार्थपरायणता ही होय. एकीपासून सर्वांचें सारखें कल्याण होतें तथापि कांहीं प्रसंगीं व्यक्तीलाही किंचित् नुकसान सोसावें लागतें. तरी विशेष लाभा-

वर नजर देऊन थोडेंसें नुकसान सोसण्यास प्रत्येकानें तयार असलें पाहिजे.

युरोपियन लोकांबरोबर आमच्या ज्या लढाया आल्या त्या प्रत्येकींत आमचे लोक जरी संख्येनें इंग्रजांपेक्षां फार होते तरी प्रत्येक लढाईंत आमचा जो पराभव होई त्याचें कारण आह्मांमध्यें एकी नव्हती हेंच होय. आमचे शिपाई बहुतेक स्वार्थसाधू असल्याकारणानें जेथें विशेष लूट मिळेल तेथें त्याचें शौर्य जास्त प्रगट होई; परंतु इतर वेळीं त्यांना जयापजयाची मद्लींच चाड नसून ते एकमेकांबद्दल बेपर्वा असत; यामुळें आज आह्मीं हजार दीड हजार वर्षांपासून पारतंत्र्य भोगीत आहों.

एकी नसल्यापासून आपलें काय नुकसान होतें व ती केल्यापासून आपले काय फायदे होतात हें आपणांस आता पूर्णपणें कळून चुकलें आहे, याकरितां प्रत्येक मनुष्यानें जर दुसऱ्यावर प्रीति केली तर सर्वांचें कल्याण होईल.

## साहस.

---

### साहसे श्रीः प्रतिवसति.

मनुष्य पुस्तकी ज्ञान संपादन करून कितीही शहाणा होवो अथवा घरचा कितीही श्रीमान असो. तो स्वभावानें साहसी असल्याशिवाय त्याचा अभ्युदय कधींही होणार नाहीं. जे लोक आपला गाव सोडून कोठेंही दुसरीकडे जात नाहींत त्यांना कोणत्याही प्रकारचा अनुभव नसतो, व आपल्या आचरणाशीं अथवा रहाटीशीं तलना करण्याचा

दुसऱ्या लोकांचा आयुष्यक्रम माहीत नसल्यामुळें त्यांना आपलें वर्तन सुधारितां येत नाहीं. यामुळें ते नेहमीं दुःस्थितीतच असतात. पुष्कळ हुषार व मेहनती मनुष्यें साहसाच्या अभावामुळें अप्रसिद्ध स्थितींतच जन्मून मृत्यु पावतात व त्यांच्या बुद्धीचा कांहीं उपयोग न झाल्यामुळें राष्ट्राचें सर्वप्रकारें नुकसान होतें.

कांहीं मनुष्यें आपण फार धाडशी आहों असा भाव घालितात. कित्येक मूर्खपणानें विलक्षण धाडसाचें काम करितात, व त्यायोगें प्रसंगीं आपला नाश करून घेतात. असल्या मनुष्यास साहसी ह्मणण्यापेक्षां अविचारी ह्मटलें असतां अधिक शोभेल. अविचारापासून आजपर्यंत कोणाचेंही हित झालेलें नाहीं. कोणतेंही संकट प्राप्त झालें असतां न डगमगतां जो त्यांतून धैर्यानें पार होतो त्यालाच साहसी मनुष्य ह्मणावें व अशाचीच कीर्ती होते.

ज्यावेळीं इंग्लंद वगैरे युरोपांतील देशांत सुधारणेचा गंधही नव्हता, ज्यावेळीं इंग्लिशलोक अंगाला रंग लावून व कातडीं पांघरून अरण्यात संचार करीत होते त्यापूर्वींच आपले लोकाची कीर्ती सर्व आशियाखंडांत जरी पसरली होती व ते जरी सर्व गुणांनीं संपन्न होते तरी सांप्रत जी त्यांना हीन दशा आली आहे तिचें कारण त्यांचा एकलकोंडेपणा होय. पूर्वीं हिंदुस्थानांतील लोक पाहिजे त्या देशांत जात असत यामुळें त्यांना साहसाची आवड होऊन त्याचेकडून मोठमोठे पराक्रम झाले. परंतु कांहीं काळानंतर धर्मबंधनें कठिण झाल्यामुळें व लोकांमध्यें धर्मभोळेपणा विशेष शिरल्यामुळें परदेशाला जाणें ह्मणजे महत्पातक समजूं लागले! व जे जातील त्यांना धर्मभ्रष्ट करण्याची

भीती घातल्यामुळें कोणी परदेशास जाईनासे झाले! परंतु यापासून आपल्या देशाचें किती नुकसान झालें आहे याची कोणाला कल्पना तरी आहे काय? या बंधनामुळें आमच्यांतील साहसी स्वभाव पार निघून गेला व त्यामुळें आमचें फार नुकसान झालें.

आजमितीस जिकडे तिकडे जी इंग्रजांची भरभराट दिसून येते आहे त्याचें मुख्य कारण त्यांचा विलक्षण धाडसी स्वभाव होय; हा त्यांचा गुण स्तुत्य व अनुकरण करण्यासारखा आहे, यांत संशय नाहीं. कितीही जंगली, ओसाड अथवा रुक्ष मुलूख असो तेथें ते गेले नाहींत असा एकही भूप्रदेश आढळावयाचा नाहीं. विमानासारखे जे शोध लागतात ते केवळ साहसी स्वभावानेंच होत. आमच्या लोकांना कोणी हजारों रुपये दिले तरी ते विमानात बसण्यास कधींही कबूल होणार नाहींत; परंतु युरोपियन लोक असल्या कृत्यांत सर्वांच्या पुढें असतात यामुळेंच त्यांचा जिकडे तिकडे विजय होतो आहे.

## व्यवहारज्ञान.

"परस्वाधीन जिणें आणि पुस्तकी विद्या" अशी आपल्यांत एक म्हण आहे ती किती यथार्थ आहे ? ही म्हण विशेषेंकरून आपल्या बायकात आढळून येते. परस्वाधीनतेशीं तुलना करण्यास पुस्तकीज्ञानाची त्यांची निवड पाहून त्याच्या मार्मिकतेबद्दल जितका आनंद होतो तितकेंच भाराभर पुस्तकें शिकून विद्वान झालेल्या परंतु व्यव-

हारज्ञानशून्य मंडळीकडे पाहून सखेदाश्चर्य वाटतें. मनुष्य पुस्तकीज्ञान शिकून कितीही शाहणा झाला असला किंवा त्याच्या मोठमोठ्या परीक्षा पास झाल्या तरी तें ज्ञान व्यवहारांत उपयोगीं कसें आणावें हें जर त्याला माहीत नाहीं तर त्याचें सर्व ज्ञान व्यर्थ होय.

तो मोठा विद्वान असला तरी जर त्याला व्यवहारज्ञानाची माहिती नाहीं तर त्याची कोण फटफजीती होते हें पंचतंत्रातील चार पंडितांच्या गोष्टीवरून सहज ध्यानांत येणार आहे. व्यवहारज्ञान हें निव्वळ घोकंपट्टीनें येत नसून आपल्या आंगच्या हुशारीवरून व व्यवहारांतील नित्याच्या अनुभवावरून प्राप्त होणारें आहे, हें ज्ञान पुस्तकीज्ञानापेक्षां फार महत्वाचें आहे; याकरितां प्रत्येक मनुष्यानें केवळ बुकातच गढून न राहतां व्यवहारज्ञान प्राप्त करून घेण्याच्या उद्योगास लागावें; ह्मणजे विद्या पूर्ण होऊन त्यांना जगाचे डावपेंच कळून येवून त्याची कधींही नाचक्की व फटफजीती होणार नाहीं.

अलीकडे इंग्रजीज्ञानानें प्रौढ होऊन डोळ्यांवर चाळशी चढविलेल्या लोकांचें जें वेळोवेळीं हासें होतें व बाजारांतून एक पैशाची भाजी आणावयाची असल्यास त्यांच्या जिवावर येतें किंवा बाजारांत दुकानदार सांगेल तितके पैसे देऊन जे परत येतात याचें कारण त्यांची व्यवहारशून्यताच नव्हे काय? वास्तवीक पाहिलें असतां त्यांना या दुर्गुणाबद्दल बिलकूल दोष देता येत नाहीं; कारण त्यांचें वय सर्व विद्या शिकण्यांत जातें; मराठी संपल्याबरोबर इंग्लिश सुरूं होतें. याप्रमाणें त्यांना व्यवहारात मन घाल-

ण्यास फुरसतच मिळत नाहीं; यामुळें प्रपंचांत शिरल्या-बरोबर त्यांचें माथें फिरून जातें.

व्यवहारज्ञान नसल्यामुळें आपलें केवळ हांसें होतें एव-ढेंच नव्हे तर प्रसंगीं आपलें बहुत नुकसान होतें. ज्याप्रमाणें एखाद्या तांग्याला जुंपण्याच्या घोड्यास नांगर ओढावयास लाविल्यास त्याची तारंबळ उडते. त्याचप्रमाणें सर्वकाळ बुकांत घालविणाऱ्या व कॉलेजच्या कांपौंडांत वाढलेल्या मुलांस अनभिज्ञ व भव्य अशा संसारसमुद्रांत एकदम नेवून लोटिल्यास त्या बिचाऱ्याची त्या घोड्याप्रमाणेंच स्थिती होणार नाहीं काय? याकरितां प्रत्येक आईबापानें आपल्या मुलांस केवळ बुकांत न गढवितां त्यांना व्यवहा-राची माहिती करून दिल्यास मोठेपणीं त्यांचें हांसें न होतां उलट त्यांचें पुस्तकीज्ञान देखील फार उपयोगी पडेल व देशाचा सर्वप्रकारें फायदा होईल.

## धनलोभ.

---

लोभात्क्रोधः प्रभवति लोभात्कामः प्रजायते ।
लोभान्मोहश्च नाशश्च लोभः पापस्य कारणम् १

वरील श्लोकावरून असें स्पष्ट होतें कीं, धनलोभ हा मनुष्याला सर्व सद्गुणापासून भ्रष्ट करून अंतीं त्याच्या नाशास कारण होतो. संपत्तीपासून सर्व सुखांची उत्पत्ती असल्यामुळें ती आपल्याजवळ विपुल असावी असें प्रत्येक मनुष्यास वाटणें हें अगदीं साहजीक आहे. परंतु संपत्ती मिळणें हें ज्याच्या त्याच्या कर्तृत्वावर अवलंबून आहे;

याकरितां संपत्ती नसतां दुःख करणें अथवा ती प्राप्त झाली असतां गर्व वाहणं हें मूर्खपणाचें काम आहे; ह्मणून प्रत्येक मनुष्यानें द्रव्याचा अभिलाष न करितां आपल्या कर्तृत्वशक्तीनें व चांगल्यारीतीनें जें काय आपणांस मिळेल त्यांतच आनंद मानून राहिल्यास त्याचें कल्याण होईल.

ज्याप्रमाणें संपत्ती ही सर्व सुखाचें साधन आहे. त्याच-प्रमाणें ती सर्व दुःखाची उत्पादकही आहे. असें जगावर संपत्तीविषयक जे चमत्कार चालले आहेत त्यांवरून दिसून येतें. संपत्तीपासून सुख अथवा दुःख होणें हें आपण तिचा जसा उपयोग करूं त्यावर अवलंबून आहे. एखादा निर्धन मनुष्यही सुखानें राहूं शकतो; व मोठा श्रीमंत मनुष्यही सदा दुःखी असतो. याचें कारण पहिल्याची संतोषवृत्ति व दुसऱ्याचा धनलोभीपणा होय. मनुष्याला संपत्ती मिळविण्याची एकदां हाव सुटली ह्मणजे मग तो न्यायान्याय, सद्गुण दुर्गुण अथवा पापपुण्य ह्यां-कडे बिलकूल लक्ष देत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याला आपल्या शरीराचीसुद्धां काळजी रहात नाहीं! अशा मनुष्याची स्थिती काय होणार?

जो मनुष्य अतीशय धनलोभी असतो त्याला कोण-त्याहीप्रकारचें सुख नसतें. कितीही जरी संपत्ती मिळाली तरी आपल्याला अधिक संपत्ती मिळावी असें त्यास वाटत असतें. त्याचप्रमाणें आपण एवढा अट्टाहास करून व एवढी दगदग सोसून जो पैसा मिळविला तो कोणी चोरून नेईल किंवा काय याची त्याला नेहमीं धास्ती वाटत असते, यामुळें त्याला कधींही अन्न गोड लागत नाहीं अथवा

गाढ झोंप येत नाहीं; यास्तव जवळ पुष्कळ संपत्ती असूनही धनलोभ्यास कोणत्याहीप्रकारचें सुख नसतें !

एकादेवेळीं धनलोभापासून फार भयंकर परिणाम घडतात. यासंबंधानें एक फार हृदयद्रावक गोष्ट आहे, ती अशी:- एका गृहस्थास एकुलता एक मुलगा होता. तो परगांवीं जाऊन फार वर्षें झालीं होतीं, त्याचें कांहींच वर्तमान न समजल्यामुळें तो मेला असें समजून ते स्वस्थ राहिले. पुढें कांहीं दिवसांनीं तो मुलगा पुष्कळ संपत्ती मिळवून आपल्या गांवी आला; परंतु आपले आईबाप उतारूंना कोणत्यारीतीनें वागवितात याची प्रतीती पाहण्याकरितां तो आपली ओळख न देतां एकाद्या पाहुण्याप्रमाणें त्यांचे घरीं उतरला, व रातची रात्र ठेवण्याकरितां ह्मणून त्यानें आपल्या आईजवळ हजार मोहोराची एक थैली दिली व आपण झोंपीं गेला. इकडे त्याच्या आईबापास द्रव्याचा लोभ सुटून त्यांनीं आपल्या पाहुण्याच्या नात्यानें आलेल्या मुलास ठार मारिलें ! हर हर ! यापेक्षां गर्हणीय व अघोरकर्म कोणतें असणार ?

---

## क्रोध.



कामक्रोधादिक जे महान् षड्रिपू मनुष्याला सारासार विचारापासून भ्रष्ट करून सैतानाच्या ताब्यांत देऊन त्याचें सर्वप्रकारें नुकसान करितात त्यां पैकीं क्रोधाचा नंबर दुसरा आहे. यावरूनच या दुर्गुणाचा मनुष्यांवर किती कडक अंमल आहे हें दिसून येईल. मनुष्यावर एकदां कां या क्रोधानें

आपला अंमल बसविला ह्मणजे तो आवरणें फार कठीण आहे, त्यापासून कोणकोणते अनर्थ घडतील याचा नेम नाहीं. क्रोधाचा झटका इतका कांहीं विलक्षण आहे कीं, त्यासरशीं मनुष्याचें देहभानच नाहींसें होतें व त्याच्या हातून एखादे वेळीं मोठा अनर्थ घडतो. याकरितां मनुष्याला कितीही राग आला तरी त्याच्या आधीन न होता कांहीं वेळ स्वस्थ बसून मन शांत करावें व आपल्या बुद्धीचा योग्य उपयोग करून आपल्या मनाला जें योग्य दिसेल तें करावें.

"अतिराग, भीक माग" अशी आपल्यामध्यें एक ह्मण आहे. यावरून क्रोधाविषयीं लोकमत काय आहे हें सहज कळून येणार आहे. शीघ्रकोपी मनुष्य कोणालाही आवडत नाहीं; व अशा मनुष्याचा लोकांना एकदां स्वभाव समजला ह्मणजे त्या मनुष्याचें कांहींच महत्व रहात नाहीं; कारण जो प्रत्येक गोष्टींत रागावणार त्याच्याकडे लक्ष्य कोण देतो अशी लोकांची समजूत होते, यामुळें तो मोठा श्रीमान् असला तरी त्याचा सर्व लोक तिरस्कार करितात, प्रत्यक्ष त्याचे मित्रही त्यास सोडतात. ह्मणून प्रत्येक मनुष्यानें क्रोध आवरिला तर त्याचें कल्याण होतें.

अति क्रोधापासून मनुष्याच्या शरीराचीही फार खराबी होते. वैद्यशास्त्रज्ञांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, अति रागापासून मनुष्याच्या नेत्रांस व मेंदूस त्रास पोहोंचून ते खराब होतात, व त्यापासून मनुष्याला पुढें फार त्रास होतो. कधीं कधीं रागाच्या आवेशांत मनुष्याचा जीवही निघून गेल्याचीं उदाहरणें घडल्याचें ऐकिवांत येतें. याप्रमाणें क्रोधापासून आपलें व कधीं कधीं दुसऱ्यांचेंही विनाकारण नुकसान होतें.

वरील विवेचनावरून मनुष्याला अगदींच क्रोध असणें उपयोगाचें नाहीं असें कोणाला वाटण्याचा संभव आहे. परंतु कोणीही तसें समजूं नये, कोणताही सद्गुण अथवा दुर्गुण होणें हें त्याच्या बऱ्यावाईट उपयोगाबरोबर आहे. त्याचप्रमाणें क्रोधाचीही गोष्ट आहे. जरी क्रोधापासून मनुष्याचें फार नुकसान होतें तरी एकाद्यानें अन्यायाचरण केलेलें पाहून स्वस्थ राहणें हें मनुष्यास शोभत नाहीं. दुसऱ्याच्या अन्यायाचरणाबद्दल प्रत्येक मनुष्याला योग्य राग आलाच पाहिजे असा राग ज्या लोकांना नाहीं तें मृतराष्ट्र होय. परंतु रागाच्या झटक्यांत कोणतीही गोष्ट करणें हा शुद्ध अविचार व वेडेपणा होय. रागाच्या आवेशांत जरी एखादी गोष्ट योग्य वाटली तरी ती तो झटका निघून गेल्यानंतर आपल्या मनाला चटका लावते व रागानें आपण दुष्कर्म केलें असा नंतर पश्चात्ताप होतो.

रागाच्या आवेशात कोणतेंही कृत्य केलें असतां पुढें आपल्याला पश्चात्ताप करावा लागतो याचा दाखला पुढें गोष्ट दिली आहे त्यावरून समजून येईल. एका बाईनें एक मुंगूस पाळिलें होतें. तें इतकें माणसाळलें होतें कीं तें तिच्या मुलांशींही खेळत असे. एके दिवशीं ती बाई मुलाला पाळण्यांत निजवून व मुंगसाला राखण ठेऊन बाहेर पाणी आणावयास गेली व परत येऊन पाहते तों मुंगसाचें तोंड रक्तानें भरलें असून पाळणा पालथा पडला आहे, तेव्हां रागाच्या आवेशांत कांहीं विचार न करितां आपल्या मुलाला यानें मारलें असें मानून त्या निरपराधी मुंगसास त्या बाईनें ठार मारिलें; नंतर पाळण्याकडे गेली तों मूल गाढ झोंपेंत असून जवळ सापाचे तुकडे पाहिले तेव्हां

तिला विलक्षण दुःख झालें, परंतु काय उपयोग ! हेंच जर तिनें राग शांत करून पाळण्याकडे प्रथम जाऊन पाहिलें असतें तर अशी गोष्ट झाली असती काय !

## मत्सर.



प्रत्येक मनुष्यास मोठेपणाची व सुखाची आशा असते सर्वांनीं आपणास शहाणा ह्मणावें व त्याप्रमाणेंच आपणाजवळ बहुत संपत्ती असावी असें वाटत असतें, अशी इच्छा होणें हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. परंतु मनुष्याला संपत्ती अथवा लोकांकडून मान मिळणें किंवा त्याचें आयुष्य सुखानें व आनंदानें जाणें हें ज्याच्या त्याच्या कर्तृत्वशक्तीवर अथवा त्याच्या गुणावर अवलंबून असतें. प्रत्येक मनुष्यानें आपण नेहमीं आनंदी असावें, आपल्याजवळ कायम भरपूर संपत्ती असावी, आपली सदैव भरभराट व्हावी अशी इच्छा केल्यास ती कधींही साध्य होणार नाहीं; कारण सुख व संपत्ती हीं कोणालाही अखंड लाभलीं नाहींत. रामचंद्रासारख्या देवादिकांनाही वनवास भोगावे लागले आहेत तेथें मनुष्याचा काय पाड !

याकरितां आपण खरोखर सुखी व्हावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें दुसऱ्यांचा मत्सर न करितां आपलें हित साधावें. वास्तविक पाहिलें असतां आपण दुसऱ्यांचा हेवा काय ह्मणून करावा ! दुसरे लोक श्रीमंत व सुखी आहेत असें पाहून, आपण दरिद्री ह्मणून दुःख मानणें व त्याचा द्वेष करणें हें फार अधमपणाचें काम होय. यापा-

सून आपला किमपीही फायदा न होतां उलट व्यर्थ दुस-ऱ्यांचें नुकसान मात्र होतें, भर्तृहरीनें ह्मटल्याप्रमाणें त्यांना कशाची उपमा द्यावी हें समजत नाहीं!

मत्सरापासून फार वाईट परिणाम घडतात. मनुष्याचें चंद्रबिंबासारखें शुद्ध मन मत्सररूपी राहूनें ग्रासिलें गेलें तर काय काय अनर्थ घडतील याचा नेम नाहीं. एकदां या दुर्गुणानें जर कां एकाद्या मनुष्याचें मन पछाडिलें तर त्या मनुष्याचें मन गढूळ होऊन जातें. त्याला ध्यानीं मनीं दुसऱ्यांचा सूड घेण्याशिवाय कांहीं दिसत नाहीं. प्रसंगीं सूड साधण्यास्तव, खोटें बोलावयास अथवा कोण-तेंही नीच काम करावयास तो कधीं मागपुढें पाहत नाहीं हें चवथ्या पुस्तकांतील "रामा व गोविंदा" या गोष्टीवरून ध्यानांत येईल. इतकें झालें तरी मत्सरी मनु-ष्याचे मनाला कधींही स्वास्थ्य असत नाहीं. लोक नेहमीं त्याचा तिरस्कार व उपहास करितात. त्याचे इच्छित हेतू तर कधींही पूर्ण होत नाहींत अशी त्याची नेहमीं फट-फजीती होते.

दुसऱ्यांचा विनाकारण मत्सर केल्यापासून काय परि-णाम घडतो हें पुढील गोष्टीवरून दिसून येईल. एका शहरांत एक मोठा सावकार रहात असे. आळसामुळें तो सदा रोगी व दुर्मुखलेला असे. त्याचे शेजारीं एक गरीब बुढ्ढा एका झोंपड्यांत रहात असे. तो मोठा मेहनती होता. अंगभर श्रम करून मिळेल ती मीठभाकर खाऊन तो मोठ्या आनंदानें राहून संध्याकाळचे वेळीं गाणें ह्मणे. तें ऐकून व तो आनंदी पाहून त्या सावकारास मोठा मत्सर उत्पन्न झाला, व त्याचा कोणत्या

रीतीनें नाश होईल याची तजवीज तो पाहूं लागला. शेवटीं त्यानें एका मनुष्यास बराच पैसा देऊन त्याची झोंपडी रात्रीचेवेळीं जाळून टाकिली. यामुळें त्या बिचाऱ्याचें पोट भरण्याचें साधन नाहीसें होऊन तो अगदीं निराश्रित झाला. परंतु सावकाराचें घोरकर्म उघडकीला आलें व सरकारानें त्या सावकाराची खोड मोडण्याकरितां त्याला व त्या बुरुडाला एक वर्षपर्यंत एका रानटी बेटांत सोडून दिलें. तेथें दोघांनाही लाकडें वाहण्याचें काम करावें लागे. सावकाराला काम करण्याची सवय नसल्यामुळें त्याचे फार हाल झाले. एकेदिवशीं त्या बुरुडानें रानांतील फुलें गोळाकरून एक उत्तम माळ तयार केली व ती त्या रानटी लोकांच्या नायकाला बक्षीस दिली. तेव्हां ते लोक खूप होऊन त्यांनीं त्याला माळा करण्याचेंच काम सांगितलें व त्या सावकाराला रानांतून फुलें आणावयास लाविलें. याप्रमाणें एक वर्षपर्यंत त्या सावकाराचे बहुत हाल झाले व तो त्या बुरुडाला शरण आला.

**सहस्वाश्रियमन्येषां यद्यपि त्वयि नास्ति सा ।**
**अन्यत्रापि सतीं लक्ष्मीं कुशला भुंजते सदा ॥१॥**

---

## आदरातिथ्य.

---

**बालो वा यदि वा वृद्धो युवा वा गृहमागतः ।**
**तस्य पूजा विधातव्या सर्वस्याभ्यागतो गुरुः ॥ १ ॥**

अनोळखी अथवा परदेशचा मनुष्य आपले घरीं आला असतां त्याला या बसा ह्मणून सन्मानानें बोलविणें, उठून

त्याला मान देणें, त्याच्याशीं सुखासमाधानानें चार गोष्टी बोलणें व सर्व तऱ्हेनें त्याला आनंद होईल असें आपलें वर्तन ठेवणें आणि आपल्या शक्त्यनुसार त्याला मीठभाकर खाऊ घालणें यालाच आदरातिथ्य ह्मणतात. परक्या मनुष्याशीं अशारीतीनें वागणें हें मनुष्यास भूषणास्पद आहे व अशारीतीनें परक्याशीं वागाव्याचें तें केवळ लौकिकाकरितां नसून तें आपलें कर्तव्य आहे असें समजूनच वागलें पाहिजे,

इंग्रजाचें राज्य होण्यापूर्वी आतांप्रमाणें जेवणाखाणाच्या व प्रवासाच्या सोई मुदलीं नव्हत्या. असें असूनही तेव्हांच्या लोकांच्या आगीं धर्माभिमान—अथवा धर्म मोठेपणा आतांपेक्षां बऱ्याच अंशानें जास्त वसत होता. त्या काळच्या मानानें पाहिलें असतां हिंदुस्थानातील प्रसिद्ध क्षेत्रांना व देवालयाना लोकांच्या झुंडीच्या झुंडी जात असत. यांपैकीं श्रीमंत लोक आपल्याबरोबर सर्व सामान वगैरे घेऊन जात असत, व त्यांबरोबर कांही गरीब लोकांचीही सोय होत असे. परंतु दुसऱ्या पुष्कळ गरीब लोकांना पायींच जावें लागत असून प्रत्येक मुक्कामाला कोणाच्या तरी घरीं उतरावें लागत असे. असल्या गरीबमनुष्यांची सोय व्हावी ह्मणून धर्माधिकाऱ्यांनीं अतीथिअभ्यागताला देवासमान मानून त्याची पूजा करावी व त्याला जातगोत कांहींही न विचारतां अन्न घालावें असा नियम करून ठेविला होता! हा नियम किती निःपक्षपाताचा आहे बरें! यावरून ब्राह्मण ह्मणजे आपलपोटे ही समजून भूट ठरेल व त्यांच्या ब्राह्मणपणाची लोक तारीफच करितील. असो.

ह्याप्रमाणें धर्माचा सक्त नियम असल्यामुळें गरीबांचेंही आदरातिथ्य फारच उत्तमप्रकारचें होई.

परंतु इंग्रजांचें राज्य झाल्यापासून जिकडे तिकडे सुधारणा झळकूं लागली आहे. बैलगाड्या मोडून अग्निरथ मोठ्या झपाट्यानें संचार करूं लागले आहेत. जिकडे तिकडे खाणावळी वगैरे झाल्यामुळें व इंग्रजी शिक्षणाच्या प्रभावानें धर्मभोळेपणा जाऊन लोक सुधारत चालल्यामुळें त्याचप्रमाणें दुष्काळ, प्लेग, टोळ, कर इत्यादि प्रकारांनी बहुतेक कंगाल होत चालल्यामुळें, सर्व लोक एकमेकांविषयीं अगदीं बेफिकीर झाले आहेत यामुळें जे गरीब लोक पूर्वी फुकट पोसले जात असत त्यांची उपासमार होऊं लागली आहे. जिकडे तिकडे चोऱ्या होवूं लागल्या आहेत व चोरटेही गरीब लोकांचा वेष धरून कोणातरी धनिकाच्या घरीं उतरतात व रात्रीं दगा देतात यामुळें कोणाचाही विश्वास कोणावर रहात नाहींसा प्रकार होत चालला आहे.

आदरातिथ्यापासून अनेक प्रकारचे फायदे होतात. अरब वगैरे अर्धवट सुधारलेल्या रानटी लोकांमध्यें जी विलक्षण प्रकारची एकी दिसून येते ती ह्या सद्गुणाच्या प्रभावानेंच होय. अरब लोकांमध्यें ह्या सद्गुणाचें महत्व जास्त आहे व ह्मणूनच त्यांच्यामध्यें एकी आहे. जोंपर्यंत ही चाल आपल्यामध्यें होती तोंपर्यंत लोकांमध्यें आतांपेक्षां परस्परांविषयीं अधीक प्रेम वसत होतें. याकरितां इंग्रजी शिक्षणाच्या ऐटीनें जुनें तेवढें सर्व वाईट असें न मानतां ह्या सद्गुणाला आपल्या देशामध्यें आणखी एकदां आग्रस्थान मिळेल तर आपल्या देशाचें फार हित होईल.

## प्रसंगावधान.

अगदीं ल्हानसें संकट आलें असतांहीं एकादा मनुष्य भिऊन अगदीं कावराबावरा होऊन जातो व त्या संकटाचें निवारण करण्याचें सामर्थ्य त्याचे आंगीं असतांहीं अथवा तें संकट दूर करण्याचें साधन असतांही आंगीं प्रसंगावधान नसल्यामुळें त्याची मती गुंग होऊन जाते. त्यास एकाद्या भित्र्याप्रमाणें हतवीर्य होऊन त्या संकटांतून निसटून जाण्याचें भान रहात नाहीं; किंबहुना त्याच्यानें प्रयत्नच करवत नाहीं इतकेंच नव्हे तो एकाद्या अजागळाप्रमाणें भिवूनगेल्याकारणानें दुसऱ्याच एकाद्या संकटांत पडतो. आंगीं प्रसंगावधान नसल्यामुळें जर एकाद्या क्षुल्लक प्रसंगीं मनुष्याची इतकी गाळण उडून जाते तर एकादा कठिण प्रसंग त्याजवर आला असतां त्याची काय अवस्था होईल याची कल्पना करा. यावरून आंगीं प्रसंगावधान नसल्यापासून कोणते अनर्थ घडून येतात हें समजून येईल.

कोणतेंही संकट प्राप्त झालें असतां मनुष्याची बुद्धी अगदीं स्थिर राहिली पाहिजे. तीमध्यें चलबिचल झणून होतां मुळीं उपयोगाचें नाहीं. आंगीं सर्वप्रकारचें शहाणपण असतांही व सर्व विद्येंत पारंगत असतांही मनुष्य प्रसंगावधान नसल्यानें कुचकामाचा होतो; कारण शहाणपणाची खरी परीक्षा प्रसंग आल्याशिवाय होत नाहीं. याकरितां मनुष्यानें प्रसंगावधान आंगीं आणिल्यास त्याचें नुकसान न होता थोड्याशा विद्येनें तो महान् पंडितापेक्षांहीं लोकमान्य होईल.

प्रत्येक लढाऊ मनुष्याला प्रसंगावधान असणें हें फार महत्वाचें आहे. कारण, त्याच्यावर कोणतेवेळीं कोणता प्रसंग गुदरेल याचा नियम नसतो. यामुळें विशेषेंकरून सेनापतीला असले प्रसंगीं विलक्षण प्रसंगावधान असलें पाहिजे; नाहीं तर त्याचा आणि त्याच्या सेनेचा एकदमच नाश व्हावयाचा. आजपर्यंत शिवाजी, बाजीरावासारखे जे महान महान् योद्धे होऊन गेले त्याच्या अंगीं ह्या विलक्षण गुणाचें वास्तव्य होतें ह्मणूनच त्यांची एवढी कीर्ती झाली यांत संशय नाहीं.

आंगीं प्रसंगावधान नसल्यापासून एकाद्या क्षुल्लक बाबींतही आपलें किती नुकसान होतें हें खालील उदाहरणावरून दृष्टोत्पत्तीस येईल—एक दिवशीं एक बाई आपल्या मुलाला मांडीवर घेऊन बसली होती. तेथें जवळच कांही बोरें पडलीं होतीं. तव्हां त्या मुलानें त्यांतील एक बोर उचलून तोंडात टाकिलें. तें मूल अगदीं लहान असल्याकारणानें तें बोर त्याच्या घशात अडकून राहिलें, यामुळें श्वासोश्वास बंद होऊन मूल तडफडूं लागलें तेव्हां ती बाई अगदीं घाबरून गेली व बोटानें तें बोर काढावयाचें सोडून घाबऱ्या घाबऱ्या शेजारीं धांवत जाऊन दुसऱ्याबायांना बोलावूं लागली, परंतु दुसऱ्या बाया येईपर्यंत तें मूल बिचारें तडफडून मेलें! अरेरे त्या आईला किती दुःख झालें असेल व याप्रमाणें किती उदाहरणें घडत असतील बरें! ह्मणून प्रत्येक मनुष्यानें प्रसंगावधान राखावें.

व्यसनेष्वेव सर्वेषु यस्य बुद्धिर्नहीयते ॥
स तेषां पारमभ्येति तत्प्रभावादसंशयम् ॥ १ ॥

## कृपणता.

ज्याप्रमाणें आयुष्य हें क्षणभंगुर आहे त्याचप्रमाणें संपत्ती ही अति चंचल व क्षणविनाशी आहे. मनुष्य हा नेहमीं कालचक्राच्या फेऱ्याबरोबर फिरत असतो. ज्याप्रमाणें तें चक्र खालीं अथवा वर जातें त्याप्रमाणें मनुष्यप्राणी एकदां संपत्तीच्या शिखरावर जाऊन बसतो. व पुनः कालचक्राच्या फेऱ्यांत सापडून धुळीस मिळून जातो. याप्रमाणें निमिषमात्रांत रावाचा रंक व रंकाचा राव होतो व हें रहाटगाडगें नेहमीं चालूंच असतें. यावरून संपत्ती ही किती अनिश्चित आहे हें दिसून येईल. त्याचप्रमाणें आपण कितीही जरी द्रव्य मिळविलें तरी आपणाबरोबर अंतीं जें कांहीं येतें तें स्वार्जित पुण्य होय. त्याशिवाय संतती संपत्तीपैकीं आपणाबरोबर कांहींच यावयाचें नाहीं. याकरितां द्रव्य व्यर्थ खर्च न करितां व त्याचप्रमाणें फार कृपणही न होतां द्रव्याचा सद्व्यय केल्यास त्या मनुष्याची लोक स्तुती करितील.

पैसा हा मनुष्याच्या इहलोकींच्या सर्व सुखाचें साधन आहे यांत संशय नाहीं. परंतु पैशापासून सुख अथवा दुःख होणें हें आपण ज्याप्रमाणें त्याचा व्यय करितों त्यावरच बहुतांशीं अवलंबून आहे हें मागें पुष्कळवेळां सांगितलें आहे. आपण जो खर्च करावयाचा तो फार काटकसरीनें केला पाहिजे कारण कुटुंबाचें चांगलेरीतीनें पोषण होऊन प्रसंगपडल्यास आपल्याजवळ थोडीबहुत शिल्लक रहावी. याप्रमाणें जो बेताबातानें खर्च करितो

त्याला सर्व लोक वाखाणतात व त्याची नेहमीं भरभराटच होते, परंतु पैसा उधळणाऱ्या मूर्ख लोकांप्रमाणें कवडीचुंबक कृपणही या भूतलावर अनेक आहेत हें पाहून पृथ्वीवरील चमत्कारांच्या अनंतत्वाची कल्पना होते.

कांहीं लोक असे आहेत कीं ते चमडी देतील परंतु दमडी देणार नाहींत! त्यांना द्रव्याची इतकी कांहीं हांव सुटलेली असते की ते सुग्रास अन्नही खात नाहींत. जवळ हवातितका पैसा असतांही कोठें कण्याभाकरी खा, कोठें खादीचीच बंडी घाल, नासका कुचका भाजीपाला घे ह्याप्रमाणें त्यांचें वर्तन असतें; मग गरीबांस दानधर्म करण्याची तर गोष्टच बोलावयास नको. चिक्कू लोकांचा व्यवसाय म्हणजे पैसा गोळा करावयाचा व त्याजकडे पाहून संतोष मानावयाचा याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. परंतु एवढें मात्र सांगून ठेविलें पाहिजे कीं, कृपणलोक पैसा जो मिळवितात तो केवळ आपल्या उपासमारीनें व विलक्षण काटकसरीनें होय. त्याच्या हातून धनलोभ्याप्रमाणें कधींही कोणाचा घातपात व्हावयाचा नाहीं.

कृपणाचा परिणाम फार वाईट होतो. कृपणापासून त्याला स्वताला अथवा दुसऱ्या कोणालाही सुख होत नाहीं. त्याच्याजवळ कितीही संपत्ती असली तरी ती त्याला असून नसून सारखीच होते. आपलें द्रव्य कोणीतरी नेईल अशी त्याला काळजी असतेच. यामुळें तो आपलें द्रव्य नेहमीं पुरून ठेवितो व रात्रंदिवस तेथें कुत्र्याप्रमाणें पहारा करीत असतो. कृपण मनुष्यें नेहमीं भ्रमिष्ट होऊन मरतात असा अनुभव आहे. त्याबद्दल एक गोष्ट प्रसिद्ध आहे. ती अशी—

एकेगांवीं एक मोठा सावकार होता; परंतु तो महा चिक्कू होता. त्यानें आपलें सर्व द्रव्य एका शेतांत पुरून ठेविलें व खुणेंकरितां ह्मणून त्यावर एक दगड ठेविला कोणी नेलें किंवा काय ह्मणून पाहण्याकरितां तो तेथें वरचेवर जाई व सुरक्षित आहे असें पाहून पुन्हां परत येई. हें सर्व कृत्य पाहून त्याच्या एका चाकराला संशय येऊन त्यानें ती जागा खणून तिथलें सर्व द्रव्य काढून नेलें. बिचारा सावकार रडत बसला व थोड्याच दिवसांत भ्रमिष्ट होऊन मरण पावला.

यद्ददासि विशिष्टेभ्यो यच्चाश्नासि दिने दिने।
तत्तेवित्तमहंमन्ये शेषं कस्यापि रक्षसि ॥ १ ॥

---

## भूतदया.

अयं निजः परोवेति गणना लघुचेतसाम् ।
उदार चरितानांतु वसुधैव कुटुंबकम् ॥ १ ॥

ज्यावेळीं मनुष्य अगदीं प्रथमावस्थेंत ह्मणजे रानटीस्थितींत असतो, त्यावेळीं त्याला भूतदयेची कल्पनाही नसते. इतर हिंस्र पशूंप्रमाणें तो पाहिजे त्या रीतीनें आपल्या पोटाची व्यवस्था करितो. या अवस्थेमध्यें स्वार्थावेरीज त्याला कांहींही समजत नाहीं. तो कोणाचीही पर्वा करीत नाहीं. दुसऱ्यानें आपणाला जखमी केलें असतां ज्याप्रमाणें आपणाला दुःख होतें, त्याचप्रमाणें आपणही दुसऱ्याला जखमी केलें असतां किंवा त्याला आपल्या पोटासाठीं ठार मारिलें असतां अथवा अन्यरीतीनें निर्दयपणानें वागविलें

असतां आपणांप्रमाणेंच त्यालाही दुःख होत असेल, अशी कल्पना त्याचे ध्यानीमनींही नसते; सारांश जोंपर्यंत मनुष्यामध्यें स्वार्थपर भाव वसत आहे तोंपर्यंत भूतदयेचें नांवही घ्यावयास नको.

परंतु मनुष्य जसजसा रानटी स्थितींतून सुधारणेची एक एक पायरी चढत जातो तसतसा त्याच्या स्वभावांतही फेर पडत जातो. सर्व बाबतींत थोडीशी सुधारणा झाल्यामुळें व अनुभवानें वनस्पती वगैरेचें ज्ञान झाल्यामुळें श्रम करून तो त्या वस्तु आपल्या उपयोगाकरितां उत्पन्न करूं लागतो. एक कृती साधली म्हणजे दुसरी याप्रमाणें तो खाण्याचे निरानिराळे पदार्थ उत्पन्न करूं शकतो. याप्रमाणें त्याच्या खाण्यांत निरनिराळ्या तऱ्हा झाल्यामुळें व खाण्याचे पदार्थही विपुल झाल्यामुळें त्याचें मन अर्थातच प्राणीहिंसेपासून सर्वांशीं जरी नाहीं तरी थोडेंबहुत परावृत्त होतें. आतां प्राणीहिंसेपासून जी पराङ्मुखता मनुष्याचे मनामध्यें उत्पन्न होते ती केवळ भूतदयेपासून होत नसून साहजिकरीत्याच उत्पन्न होते असें म्हटलें पाहिजे; परंतु या सुमारास कोणत्याही कारणानें कां होईना, भूतदयेचा अंकूर मनुष्याचे अंतःकरणांत उत्पन्न होतो व जास्त सुधारणा झाली म्हणजे सदसद्विवेक बुद्धी जागृत होऊन त्या अंकुरापासून भूतदयेचा जंगी वृक्ष बनतो.

जसजशी सुधारणा होत जाते तसतसें मनुष्याचें मन प्राणी हिंसेपासून पराङ्मुख होत जाऊन " अहिंसा परमो धर्मः " म्हणजे सर्व प्राण्यावर दया करणें हाच परम श्रेष्ठ धर्म होय अशी कल्पना होते; याचें मुख्य कारण स्वार्थपरता पुष्कळच अंशीं कमी होऊन आपणाला दुसऱ्यांनीं

दुःख दिलें असतां जसें आपणांस वाईट वाटतें तसें आपण दुसऱ्यांस छळिलें असतां त्यापासून त्यांनाही दुःख होत असेल अशी कल्पना होते हेंच होय. ज्याअर्थी परमेश्वरानें सर्व प्राणी उत्पन्न केले आहेत त्याअर्थी त्यांना दुखविणें अथवा त्यांचा नाश करणें हें महापातक होय, अशी समजूत होऊन त्याचें मन भूतदयेकडे वळतें.

वास्तविक पाहिलें असतां ईश्वरानें सर्व प्राण्यांस निर्माण करून सर्वांना सारखीच स्वातंत्र्यता दिली असली पाहिजे. परंतु रानटी स्थितीपासून श्रेष्ठत्वास पावलेल्या मनुष्यानें इतर प्राण्यावर आपला दाब ठेविला आहे, व पुढेंही तो आपल्या बुद्धीमत्तेनें सर्व प्राण्यांवर आपलें वर्चस्व स्थापून त्यांच्याकडून पाहिजे तें काम करून घेईल. मनुष्याची स्वार्थपरता पुर्तेपणी कधींही नष्ट होणार नाहीं. याकरितां मनुष्यानें प्रत्येक सजातीय अथवा विजातीय प्राण्यांवर दया करणें हें त्याचें कर्तव्य होय.

---

## ऋण.

" ऋणं कृत्वा घृतं पिव " अशी कांहीं मंडळी आपल्याला उपदेश करीत असते. त्याचें ह्मणणें असें असतें कीं, जोंपर्यंत आपण ह्या जगांत आहों तोंपर्यंत नेहमीं मनाला काळजी लागूं न देतां अथवा आजचा दिवस पार पडला; उद्यां आपलें पोट कसें भरेल अशी व्यर्थ चिंता

न वाहतां जे काय आपणाला चार दिवस ह्या जगामध्यें घालवावयाचे ते अशा तापत्रयानें व दुःखानें काय ह्मणून घालवावे. जगांत असेतोंपर्यंत चार दिवस ध्याची मारून चैन. पुढचें पुढ पाहून घेतां येईल. स्वर्गाला जाऊन स्वर्गसुख पाहून आलेलीं माणसें थोडींच आहेत; मग ज्या सुखाची तुह्मांला कल्पनाही नाहीं अशा दुर्मिळ सुखाची हांव धरण्यापेक्षां जोंपर्यंत आपण ह्या जगांत आहों तोंपर्यंत कर्ज काढून का होईना आनंदीआनंद करणें यांतच मजा आहे.

वास्तविक पाहिलें असतां प्रत्येक मनुष्यानें आपण ज्या ज्या स्थितींत आहे त्या त्या स्थितींतच सुख मानून आनंदानें व समाधानवृत्तीनें रहाणें हें त्याच्या हिताचें होय. या जीवलोकची वस्ती अगदीं क्षणिक आहे. याकरितां नेहमीं असंतोषानें राहण्यापेक्षां असेल त्यातच आनंद मानून सद्धर्मानें राहणें हें चागलें होय. परंतु ऋण काढून चैन करणें ह्मणजे परान्नपुष्ट होणें अथवा दुसऱ्याच्या जिवावर उड्या मारण्यासारखेंच नव्हे काय? दुसऱ्याकडून पैसे घेऊन चैन करण्यापेक्षां कष्टानें मिळविलेल्या पैशांतच आनंदानें राहणें चांगलें नव्हे असें कोण ह्मणेल?

ज्या मनुष्याला ह्या कष्टमय जगांत आपलें आयुष्य असलेल्या स्थितींतच सुखानें घालवावें असें वाटत असेल त्यानें ऋणी न होण्याविषयीं खबरदारी घ्यावी ह्मणजे झालें. आपणाला जें काय मिळतें त्यांतून प्रपंचाला चांगल्या-

रीतीनें पुरून जें थोडेंफार उरेल तें शिलक टाकीत गेलें असतां त्यापासून आपणाला एखादे संकटाचेवेळीं उपयोग होतो, व ऋण काढून फजीत पावावयाचा प्रसंग येत नाहीं. त्याचप्रमाणें आपणास जे पदार्थ अवश्य लागतील तेवढेच घ्यावेत. उगाच चैनीचे ह्मणून अर्थात निरुपयोगी पदार्थ कोणी घेऊं नये. त्यांपासून जरी क्षणिक सुख होतें तरी पुढें आपलें सर्वप्रकारें नुकसान होतें.

ऋण होण्याचीं अनेक कारणें आहेत. आपले लोक पहिल्यापासूनच परलोकसुखाची इच्छा करणारे असल्यामुळें त्यांना ऐहिक सुखें अथवा चैन तुच्छ वाटत होती, परंतु इंग्रजलोकांचें राज्य सुरू झाल्यापासून आमचीं मनें पारलौकिकापेक्षां ऐहिक सुखाकडे जास्त वळूं लागलीं आहेत. यामुळें लोकांमध्यें चैन व पोकळ डौल पसरत चालला आहे. त्याचप्रमाणें लग्नाच्या खर्चाच्या विलक्षण चाली पडल्या आहेत. यामुळें प्राप्ती थोडी व खर्च फार अशी स्थिती होऊन त्यांना कर्ज काढावें लागून शेवटीं त्यांचा नाश होतो.

कर्जबाजारी मनुष्याची स्थिती फार वाईट असते. ज्याप्रमाणें रिकामी पिशवी ताठ उभी राहूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें कर्जबाजाऱ्याला लोकांमध्यें तोंड दाखविण्यास जागा रहात नाहीं. यामुळें त्याच्या सर्व कुलशीलावर पाणी पडून त्याची जनामध्यें छीथू होते त्याच्या सर्व सद्गुणांचें मातेरें होऊन दुर्गुण त्याच्या आंगीं जडतात.

त्याची पत नाहींशी होऊन त्याला कोणीही विचारीत नाहींसें होतें. शेवटीं कर्ज फिटेनासें झालें ह्मणजे त्याच्या सर्व घरादारावर सावकाराची धाड पडून त्याच्या मड-क्यांचाही लिलाव होऊन बिचारा देशोधडीला लागतो! याकरितां कर्ज काढून अशी विटंबना व नाश करून घेण्यापेक्षां बेताबातानें खर्च करून कर्जापासून दूर रहा.

पापं कर्तुमृणं कर्तुं मन्यंते मानवाः सुखम् ।
परिणामोऽति गहनो महतामपि नाशकृत् ॥ १ ॥

## परोपकार.



परोपकाराय दुहन्ति गावः ।
परोपकाराय फलन्ति वृक्षाः ॥
परोपकाराय वहन्ति नद्यः ।
परोपकाराय मिदंशरीरम् ॥ १ ॥

ज्यावेळीं कमरेभोंवती डहाळ्या बांधून अथवा कसलें तरी चर्म पांघरून हिंस्र पशूंप्रमाणें दिसण्याकरितांच कीं काय अंगाला तरतऱ्हेचे रंग फांसून रानटी मनुष्य अर-ण्यांतून भक्ष्याकरितां वनचराप्रमाणें हिंडत असतो; भक्ष्य दृष्टीस पडल्याबरोबर निःशंकपणें त्याजवर धावून त्यास गट्ट करून टाकतो. अशा वेळीं दुसऱ्याला इजा झालेली पाहून स्वतांला वाईट वाटून घेणारा किंवा पर-

दुःखानें दुःखी होऊन त्याच्या दुःखशमनार्थ प्रयत्न कर-ण्यास तयार होणारा कोणी तरी मिळेल काय ? अशावेळी मनुष्यामध्यें स्वार्थभाव पूर्णरीतीनें वसत असतो म्हणून तो पाहिजे तें करण्यास प्रवृत्त होतो व यामुळें त्याला परो-पकाराची तर नाहींच. परदुखाचीही कल्पना नसते. ह्यावरून परोपकाराची प्रवृत्ति सुधारलेल्या लोकांतच आढळून येणार हें निःसशय आहे.

तत्वज्ञानामध्यें पृथ्वींतील सर्वराष्ट्रांहून पुढें गेलेल्या आपल्या लोकांत " परोपकारासारखें पुण्य नाहीं, व परपी-डेसारखें पाप नाहीं " ह्या अत्युच्च तत्वाचा चोहोंकडे झालेला फैलाव पाहून आश्चर्य वाटावयाचें कारण राहणार नाहीं; सुधारणेपासूनच मूळ परोपकाराची जागृति मनामध्यें उत्पन्न होते. परोपकाराचें मूळ मनामध्यें पूर्णपणें रुजण्यास भूतदया ही मुख्य होय. जोंपर्यंत दुसऱ्याला पिडा दिल्या-पासून अथवा अन्य कारणांनीं दुःख होत असल्यास त्या दुःखापासून त्याला किती वाईट वाटत असेल व किती हाल भोगावे लागत असतील याची कल्पना स्वताला झाल्याशिवाय मनुष्याचें मन परोपकाराकडे कधींही वळ-णार नाहीं. मनाची इतकी उच्चस्थिती होण्यास मनुष्या-मध्यें सुधारणा बरीच झाली पाहिजे हें निर्विवाद आहे.

अंगावर फक्त चिंध्या उरल्या आहेत यामुळें थंडीनें सर्वांग बधिर होऊन कुडकुडत आहे व तहानेनें आणि भुकेनें प्राण व्याकूळ होऊन डोळे फिरवीत आहे अशा

स्थितीमध्यें एकाद्या मनुष्यानें आपणांकडे अन्न अथवा वस्त्र मागितलें असतां कोणत्या मनुष्यांत दयेचा पाझर फुटुन शक्त्यनुसार तो त्याला मदत करणार नाहीं बरें? संपत्ती ही फार अशाश्वत आहे, त्याचप्रमाणें नेहमीं आपण सुखांतच राहूं असा नियम नाहीं, याकरिता प्रत्येक मनुष्यानें गरीब मनुष्यास शक्त्युनुसार मदत करणें हें त्याचें कर्तव्य होय.

परोपकारी मनुष्यांवर इतर लोकांचा फार लोभ असतो व त्यांची कीर्ती अजरामर राहते. देवही त्यांची कीर्ती चहूंकडे पसरण्याकरितां त्याजवर संकटें आणितो हें जॉन हॉवर्डच्या गोष्टीवरून कळून येईल. हॉवर्डनें आपल्या सुखाकडेही लक्ष न देतां केवळ परोपकाराकडे आपली काया झिजविली व अनेक संकटें आलीं असतांही त्यानें आपलें काम मोठ्या उत्साहानें चालविलें यावरून त्याच्या मनाचा मोठेपणा दिसून येतो.

